# प्रिय मुलांनो आणि मुलींनो !

हे पुस्तक नामवंत सोविएत कवी आणि लेखक कायूम तांग्रीकुलीयेव यांनी लिहिले आहे. जर आपल्याला त्यांच्याकडे पाहुणे म्हणून जायची इच्छा झाली असती, तर आपल्याला आगगाडीत बसावे लागले असते; नाही, त्यापेक्षा विमानातून जाणे जास्त चांगले; आणि खूप दूरवर सोविएत संघाच्या दक्षिणेस भाजत्या तपमानाच्या तुर्कमेनीयाकडे उड्डाण केले असते. हा प्रदेश अद्‌भुत आहे. तेथे शहरातील रस्त्यांवर रंगीबेरंगी मोटारींशेजारी पाठीवर ओझे लादलेला ऐटबाज उंट अथवा मोठ्या डोळ्यांचा गाढव पाहता येतो. तेथील शेतांमध्ये केवळ गहूच नव्हे, तर कापूसही पिकतो. कापसापासून सुंदर कापड तयार करतात व कापडापासून लहान-थोरांना फ्रॉक आणि सदरे शिवतात. आणि बागांमध्ये... तेथे काय नाही! तांबडी सफरचंदे आणि तपकिरी नास-पाती, पिकलेल्या बियांनी गच्च भरलेली डाळिंबे, द्राक्षांनी लगडलेल्या वेली, जर्दाळू, बदाम. शेतांमध्ये साखरेसारखी प्रचंड गोड टरबुजे व गोल गरगरीत कलिंगडे पिकतात. तुर्कमेनीयात जें पिकते आणि लोक ज्यांची पैदास करतात त्या सर्व गोष्टी उपयुक्त व चवदार आहेत. लोक पेरणी करतात, पाण्याचे शिंपण घालतात, काळजी वाहतात – पिके काही आपोआप वाढत नाहीत! नंतर पीक गोळा करण्यासाठीही भरपूर श्रम घ्यावे लागतात.

ह्या सर्व गोष्टींबद्दल कायूम तांग्रीकुलीयेव स्वतःच्या पुस्तकांमधून लिहितात. काराकूम वाळवंटाजवळच्या एका तुर्कमेनी आऊलात (छोटे खेडे) त्यांचा जन्म झाला व त्यांचे बालपण तेथेच गेले. शेतकऱ्याच्या श्रमांची ओळख कायूमना लहानपणीच घडली – शेतावर, वाफ्यात, बागेत त्यांनी मोठ्या माणसांना कामात मदत केली. पाणी नसलेल्या वाळवंटात लोकांनी पाण्याने भरलेली नवी नदी – काराकूम कालवा – कशी आणली, कोरड्या मृत जमिनीचे हिरव्या शेतांमध्ये आणि फुलबागांमध्ये रूपांतर कसे घडले, हे त्यांनी पाहिले. सर्व मुलांना ह्याबद्दलची खरी गोष्ट सांगायची त्यांना इच्छा झाली.

आता पंचवीस वर्षे कायूम तांग्रीकुलीयेव यांच्या मजेदार कविता, रंजक गोष्टी आणि कहाण्या सर्व सोविएत प्रजासत्ताकांमधील व अनेक परदेशां-मधील मुले वाचत आहेत. वाचतात आणि जणू कायूम तांग्रीकुलीयेव यांच्या जन्मभूमीत, तुर्कमेनीयात, स्वतः गेल्याचे त्यांना भासते. आपल्या ह्या समान मित्राचे, गुणी लेखक कायूम तांग्रीकुलीयेव यांचे, आभार मानले पाहिजेत!

या. आकीम

कायूम तांग्रीकुलीयेव

# सोनेरी पेला

अनुवादः अनिल हवालदार

चित्रेः गेओर्गी यूदिन



**К. Тангрыкулиев**
ЗОЛОТАЯ ЧАША
*на языке маратхи*

**Tangrykuliev K.**
A GOLDEN GOBLET
*in Marathi*





सोविएत संघात मुद्रित

ISBN 5-05-002192-8



# किझिल-आयाक

सूर्याखाली जेवढी आऊले आहेत त्या सर्वांमध्ये माझे जन्मआऊल सगळ्यात उत्तम आणि सर्वांत सुंदर आहे. माझ्या आऊलाचा आवाज – सर्व नद्यांमधील मधुर नदी अमूदार्या हिचे अखंड गाणे. आयुष्यात फक्त एकदा अमूदार्याचा फक्त एक घोट पिऊन बघा आणि तुम्ही त्याची चव कधीही विसरणार नाही.

अजूनपर्यंत माझ्या आऊलाभोवतीच्या जमिनीवर सकाळच्या प्रहरी सशांचे, साळिं-दरांचे, कोल्ह्यांचे ठसे आढळतात.

लहानपणी मला काही केल्या समजत नव्हते: किझिल-आयाक म्हणजे काय? कदाचित इथे माझ्या नातेवाईकांचा दोष होता. ते आमच्याकडे आले म्हणजे नेहमी मला चिडवायचे:

"तुझे पाय दाखव बघू! जर तू किझिल-आयाकचा पोरगा असशील, तर तुझे पाय सोनेरी असले पाहिजेत!"

"किझिल" ह्या शब्दाचा तुर्कमेनी भाषेत अर्थ आहे – तांबडा. पण तो "सोनेरी" ह्या अर्थानेही वापरता येतो. आयाक – पाय. पण शेजारच्या लोकांच्या भाषेत "आयाक" म्हणजे थाळी, प्याला, पेला. परीकथेतील शाह जेमशिदपाशी एक अद्भुत सोनेरी थाळी होती – किझिल-आयाक. जगात काय काय चालले आहे ते सर्व ह्या थाळीत शाह जेमशिद बघायचा.

बहुधा आऊलाला हे नाव त्याच्या पूर्वीच्या रहिवाशांच्या श्रीमंतीवरून पडले असावे. असे म्हणतात की, वादळी हवेत आकाशाला काळे मेघ जसे झाकून टाकतात, तसे

इथल्या वाळूला मेंढ्यांचे कळप झाकून टाकत. एक खरे, हे कळप फक्त मूठभर बाय* लोकांच्या मालकीचे होते. जेव्हा लोकांनी स्वतःच्या हाती सत्ता घेतली, तेव्हा बाय स्वतःच्या गुरा-ढोरांसकट अफगाणिस्तानात निघून गेले.

किझिल-आयाकच्या निर्मनुष्य, पण सुपीक जमिनीवर शेजारच्या आऊलामधून येऊन स्थायिक झालेल्या पहिल्या साठ शेतकऱ्यांमध्ये माझ्या वडिलांचा समावेश होता. 'त्याझे-दून्या' (नवे जग) सामुदायिक शेत त्यांनी स्थापन केले.

तेव्हापासून खूप वर्षे उलटली. सोनेरी पेला दरिद्री बनला नाही. आजही माझे आऊल खरोखरीच सोनेरी पेला आहे – ही जमीन सोडून पळून गेलेल्या द्रोह्यांना त्याबद्दल कडवट मत्सर वाटतो.

# पहिली यंत्रे

आमचे घर खेड्यापासून दूर होते. आमच्या भागात रस्तेसुद्धा नव्हते. घरापाठी-मागेच हिरव्या झाडांची दाटी होती. आमच्या घरापासून सर्वांत जवळचे घर होते आन्नाली-आगा यांचे. पण माझा मित्र याझ्ली याच्याबरोबर बोलायचे असले तर छपरावर किंवा झाडावर चढावे लागायचे.

त्या दिवशी सकाळी याझ्ली प्रथम छपरावर चढला होता.

"का-यू-म!" आख्ख्या स्तेपवर त्याचा आवाज घुमत होता.

दुधाचा पेला खाली ठेवून मी अंगणात धावलो.

"का-य!" उत्तरादाखल मी बेंबीच्या देठापासून ओरडलो.

"आ-म-च्या-कडं ये!" याझ्ली ओरडला. "बाबांपाशी लोखंडी बैलगाडी आहे!"

आन्नाली-आगा यांच्या घराकडे मी धावू लागलो.

त्यांच्या अंगणात प्रचंड लोखंडी चाकांचा विचित्र लोखंडी प्राणी उभा होता.

"तो आग खातो!" याझ्ली दबत्या आवाजात म्हणाला आणि पटकन आसनावर चढून बसला. "चढ! घाबरू नको, जोवर त्याला आग देत नाहीस, तोवर तो धाव-णार नाही."

पण मला भीती वाटतेय.

घरातून आन्नाली-आगा बाहेर आले.

"बैस रे उंटाच्या पिल्ला, याझ्लीपाशी."

---

* बाय – संधन जमीनदार – अनु.

आता माझी सुटका नव्हती. कठीण आसनावर चढून बसलो. आन्नाली-आगा यांनी इंजिन चालू केले. ट्रॅक्टर थरारला, खडखड वाजू लागला, मी याझ्लीला घट्ट चिकटून बसलो आणि आम्ही निघालो. शेतावर पोहोचेपर्यंत लोखंडी बैलगाडीच्या वासाची, तिच्या खडखडीची मला सवय झाली. मी पाहिले की, आमच्या मागोमाग कुऱ्हाडीच्या पात्यांप्रमाणे दात असलेली आणखी एक लोखंडी वस्तू फरफटत येत होती. मी कुठे पाहतोय ते आन्नाली-आगांना समजले आणि त्यांनी विचारले:

"ठाऊक आहे तुला, काय हे?"

"ठाऊक आहे!" मी बरळलो, "हे लोखंडी बैलगाडीचं पिल्लू!"

आन्नाली-आगा खो खो हसले.

"पोरांनो, हा नांगर आहे! नांगर. मी आता जमीन नांगरायचं काम करीन आणि तुम्ही घरी पळा."

अशा रीतीने पहिल्या लोखंडी यंत्राशी माझी ओळख झाली.

याझ्ली माझ्यापेक्षा वयाने मोठा होता. मी त्याच्यापाठून शेपटीसारखा फिरायचा, त्याचे नेहमी ऐकायचा.

"सापडली!" एका झुडुपाखालून कुरळया केसांची अळंबी उपटून काढत याझ्ली ओरडला. "चल, त्यांना आपण गुडघ्यांवर चोळू!"

"कशाला?"

"म्हणजे जास्त वेगानं धावता येईल. तेव्हा आपल्याला "सैतानी चाक" गाठणार नाही."

मी सभोवती बघू लागलो.

"कुठं आहे ते?"

"माझ्या काकापाशी! तो त्याच्यावर बसतो, पाय हलवतो आणि घोड्यावरून जाण्यापेक्षा जास्त वेगानं जातो. काका आला म्हणजे मी तुला हाक मारीन."

आम्ही अळंब्या गुडघ्यांवर चोळतो, लांब डहाळ्या तोडून घेतो आणि रस्त्यावरची धूळ टाचांनी उडवत अंगातल्या सर्व ताकदीनिशी धावतो.

आणि एकदम थांबलो! आमच्या वाटेत प्रचंड सापाची खूण दिसते. सापाची कात नक्षीदार आहे. आम्ही खुणेपाठोपाठ चालू लागतो, पण पट्टा संपत नाही. आम्ही पावले हळू टाकू लागलो, सभोवार नजर टाकू लागलो, थांबू लागलो, पण खुणा याझ्लीच्या काकाच्या घराकडे वळत गेलेल्या.

भिंतीपाशी "सैतानी चाक" उभे आहे – सायकल.

माझ्या बाबतीत असे घडले होते. यंत्रे, वीज, गॅस यांची सवय झालेल्या माझ्या वयाच्या जवळजवळ सर्व लोकांच्या बाबतीत असेच घडले होते. कोणे एके काळी यंत्रांच्या ठशांना आम्ही भयंकर सापांचे ठसे समजत होतो. वस्तुतः आम्ही अजून काही म्हातारे नाही! गेल्या पन्नास वर्षांत लोकांनी खूप गोष्टी केल्या! विचार करू लागलो तर डोके गरगरते. जीवनाला, लोकांनी घडवलेल्या गोष्टींना आता परीकथा कुठून गाठ-णार?

# आठवणी

जेव्हा माझ्या बालपणातील प्रतिमांच्या पहिल्या आठवणी मी चाचपू लागतो, तेव्हा मला सर्व दिसू लागते – पॉप्लरची झाडे, जुन्या किल्ल्याच्या ढासळलेल्या भिंती, आम्हा पोरांबरोबर बसण्यासाठी आणि आम्ही पळून जाऊ नये, दंगामस्ती करू नये म्हणून आम्हाला परीकथा सांगणारी तोती आजी. मला आणखी आठवते – गरीब शेतक-ऱ्यांना मेंढ्या वाटण्यात आल्या होत्या. नव्या मालकांनी त्या मेंढ्यांच्या पाठींवर ताबड-तोब खास खुणा चितारल्या. स्वतःच्या भटक्या जनावरांचा शेजाऱ्यांच्या जनावरांशी घोटाळा होऊ नये म्हणून धुतल्या न जाणाऱ्या रंगाने त्यांनी खुणा चितारल्या. रंगविलेल्या मेंढ्या ही माझ्या आरंभीच्या बालपणातील सर्वांत ठळक आठवण.

याझ्लीने मला कसे फसविले होते, हीसुद्धा आठवण आहे. त्याने मला विचारले, तुला गोष्ट ऐकायचीय? आणि तो सांगू लागला:

"कोणे एके काळी एक याशुली* रहात होता. त्याला दोन मुलगे होते. एका मुलाचे नाव ऐत – म्हणजे 'बोल' आणि दुसऱ्याचे नाव ऐत्मा – 'बोलू नको.' बापाचे हुकूम ऐत तंतोतंत पाळायचा. 'ऐत, हातोडा आण!' बाप म्हणायचा आणि ऐत हातोडा आणायचा. 'ऐत, गाणं म्हण!' ऐत गाणे म्हणायचा. ऐत खूप बुद्धिमान पोरगा होता. पण दुसरा... काय बरं त्याचं नाव?" याझ्लीने हाताने डोके आवळले.

"ऐत्मा!" मी त्याला सांगितले.

"ठीक आहे, मी नाही पुढं बोलत!" याझ्ली हसू लागला.

माझी फसवणूक करण्यात आली, गोष्ट माझ्यापासून लपवून ठेवण्यात आली हे मला समजले आणि मी रडू लागलो. आजही मला वाईट वाटते.

माझी पहिली भीती मला आठवते. वसंताचे दिवस होते. हवा उबदार बनत होती,

---

* याशुली – म्हातारा, वृद्ध पुरुषाला आदराने संबोधन.

झाडांना पालवी फुटत होती, टेकाडांवर फुले उमलत होती आणि धुराचा वास सर्वत्र दरवळत होता. आत्तासुद्धा वसंताचा गंध मी प्रथम अनुभवतो – कोवळ्या पानांचा, पावसामुळे सतत ओल्या बनलेल्या जमिनीचा आणि हिवाळ्यात वाफ्यांमध्ये जमलेला कचरा गोळा करून लोक त्याला पेटवतात तेव्हा त्यातून उमटणाऱ्या, वातावरण स्वच्छ करणाऱ्या धुराचा हलका गंध – तेव्हा माझ्या डोळ्यांमध्ये आनंदाची आसवे दाटू लागतात.

सर्पण गोळा करायला आम्हाला धाडण्यात आले होते. कोरड्या काटक्या मोडून आणायला. एव्हाना संध्याकाळ झाली होती. आम्ही तिघे गेलो होतो: याझ्ली, जूमा आणि मी. पाण्याच्या चराच्या जुन्या पात्राकडे गेलो. जूमा आमचा शेजारी होता आणि याझ्लीपेक्षा वयाने मोठा होता. सर्पण आणण्यासाठी कधी कधी त्याला गाढवसुद्धा मिळत.

आम्ही प्रत्येकाने पटकन लाकडांचा एकेक भारा बनवला. घरी परतायला हरकत नव्हती, पण जूमाने दूरच्या जुनाट, एकाकी जर्दाळूच्या झाडाकडे बोट दाखविले. त्या झाडावर कसलेतरी मोठे पक्षी घिरट्या घालत होते.

"चला, घरटं बघू!" जूमाने प्रस्ताव मांडला.

आम्ही लाकडाचे भारे, कुऱ्हाडी उचलल्या आणि एकाकी झाडाकडे धावलो.

"घरट्यापर्यंत सर्वांत प्रथम कोण पोचतो?" जूमाने नवी स्पर्धा सुचविली.

मी आणि याझ्ली वाळक्या फांद्यांवरून भराभरा चढू लागलो, पण सर्वांत थोरला जूमा खाली जमिनीवरच राहिला होता हे आमच्या ध्यानात आले नाही. याझ्लीने मला हरवले, केवळ एका सेकंदाच्या फरकाने. आम्ही घरट्यात डोकावलो. तेथे तीन टोकदार, निळसर, ठिपकेदार अंडी होती. कोंबडीच्या अंड्यांपेक्षा ह्या अंड्याचा आकार मोठा नव्हता. अंडे उचलून घेण्यासाठी मी हात लांबवला, पण त्याच क्षणी झाकोळून आले, पंखांची फडफड झाली व माझ्या टोपीवर टोकदार, कठीण अशा कशाचातरी प्रहार झाला.

याझ्ली पटकन फांद्यांवरून घसरत गवती सापासारखा खाली गेला.

"कायूम! घसर खाली! आणखी मारेल!" तो मला ओरडला.

गुडघे, पाय खरचटत मी उतरू लागलो. जेव्हा जमिनीवर उतरलो तेव्हा माझे पाय लटलट कापत होते.

जूमा खो खो हसला:

"मग काय, गिधाडांशी ओळख झाली?"

आम्ही झाडापासून जास्तीत जास्त लांब पळालो व विश्रांतीसाठी खाली बसलो. सूर्याचा लालभडक गोळा क्षितिजाआड गेला. आम्ही कुऱ्हाडींनी जुनाट खुंट फोडू लागलो,

पण संध्याछाया दाट बनल्या आणि लौकरच नभात तारे चमकू लागले. आम्ही घराकडे लगबगीने निघालो. सर्वांत पुढे जूमा चालत होता. मी शेवटी होतो. अचानक जोराचा वारा सुटला. लाकडांचे भारे टोचत होते, जड होते. वाऱ्याच्या प्रत्येक झोतासरशी आमच्या झोकांड्या जात होत्या.

जेव्हा कुरणातील धुळमाखल्या रुंद वाटेवर आम्ही आलो, तेव्हा मी मागे नजर टाकली आणि एकदम थिजलो. आमच्या पाठी तीन लांडगे जीव तोडून धावत होते.

"लांडगे!" मी पुटपुटलो, पण धावण्याऐवजी खाली धुळीत मटकन बसलो. माझे मित्र धूम पळू लागले होते, पण मी दिसत नाही असे बघून थांबले आणि नंतर माझ्यापाशी आले.

"ऊठ!" जूमा ओरडला. "लांडग्यांना तू कुठं बघितलंस?"

मी डोळे उघडले आणि हलणाऱ्या काळ्या आकृती दाखविल्या. जूमा शूरपणे पुढे धावला आणि एका "लांडग्या"ला त्याने लाथेने उडवून लावले. गेल्या वर्षीच्या गडगडत्या तणाचा तो चेंडू होता.

आम्ही उल्हसित वृत्तींमध्ये परतलो, पण त्या रात्री मला झोप लागणे अवघड गेले. पहिली गोष्ट म्हणजे माझा भित्रेपणा मी दाखवला होता, दुसरी गोष्ट म्हणजे जूमा चांगला अथवा वाईट माणूस होता हे मला ठरवता येईना. त्याने आम्हाला गिधाडांच्या घरट्यावर चढायला लावले होते. गिधाडाने माझा डोळा फोडणे शक्य होते. पण जेव्हा मी भितीपायी लांडग्यांमध्ये थांबलो, तेव्हा त्याने मला टाकले नव्हते आणि नंतर घरापर्यंत सोबत केली होती.

अशा रीतीने त्या रात्री मी कोणतेही निर्णय घेऊ शकलो नाही.

# चार डोळ्यांचा कुत्रा

माझे वडील जेव्हा बाजारातून परतले, तेव्हा मी आणि याझ्ली अंगणात खेळत होतो. वडिलांनी गाढवाच्या पाठीवरून रंगीबेरंगी हुर्जून* सांभाळून उतरवली. हुर्जूनच्या एका पिशवीत भोपळा होता, काही थैल्या होत्या आणि दुसऱ्या पिशवीत—काहीतरी मोठ्या आकाराचे, जिवंत. वडिलांनी ते जमिनीवर ठेवून हुकूम दिला:

---

* हुर्जून — खोगीरावर आडवी टाकण्यात येणारी दुहेरी पडशी.

“नीज !”

शेपूटवाला आणि पडक्या कानांचा तो गंजक्या लाल रंगाचा प्राणी आज्ञाधारकपणे वडिलांच्या पायांशी आडवा निजला.

“मुला,” वडील मला म्हणाले, “मी तुझ्यासाठी शिकारी कुत्रा आणलाय. त्याचं नाव झेक. तो हुषार आहे, माणसाचं बोलणं त्याला समजतं.”

वडिलांनी कुत्र्याला चाबूक हुंगायला दिला आणि चाबूक लांब झुडुपांमध्ये फेकला.



“झेक, शोधून काढ !” हुकुमाचे पालन करायला कुत्रा तत्परतेने धावला, त्याने चाबूक शोधून आणला.

याझ्लीने हे पाहिले आणि स्वतःच्या घराकडे धाव घेतली. त्याने त्याच्या वडिलांना, आन्नाली-आगांना आणि जाकूल काकाला अद्‌भुत कुत्र्याला पाहण्यासाठी आणले. लौकरच बघ्यांचा मोठा घोळका जमला.

आन्नाली-आगा ताबडतोब माझ्या वडिलांना सल्ला देऊ लागले :

“तांग्रीकुली-आगा, कुत्र्याची शेपूट आणि त्याचे कान तोकडे केले पाहिजेत.”

“बरोबर बोललास,” काळपट चेहऱ्याच्या म्हाताऱ्याने होकारात्मक डोके हलविले. “लांडगा पहिल्या झटक्यात कुत्र्याची शेपूट किंवा कान पकडतो.”

वडिलांनी हे संभाषण ऐकून घेतले, डोक्यावरची टोपी उतरवली आणि तासलेले डोके कुरवाळत म्हटले :

"माझ्या बंधूनो, झेक लांडग्यांचा शिकारी नाही, लांडग्यांशी झगडणं त्याचं काम नव्हे. त्याचं काम – शिकाऱ्यांनी मारलेली शिकार शोधणं : कवडे, लाव, ससे. त्याची ताकद बळात नाही, हुंगण्यात आहे. एक किलोमीटर अंतरावरच्या तीतराचा त्याला वास लागतो आणि तिथपर्यंत तो शिकाऱ्याला घेऊन जातो."

लोकांच्या घोळक्यातून माझा मित्र जूमा म्हणाला :

"माननीय तांग्रीकुली-आगा, असं म्हणतात की ह्या कुत्र्याला माणसाचं बोलणं समजतं. हे खरं आहे?"

"माझ्या उंटाच्या पिल्ला," वडील स्मित करीत म्हणाले, "चांगला शिकारी कुत्रा बोलण्याकडं नव्हे तर मालकाच्या चेहऱ्याकडं लक्ष देतो आणि त्याचे विचार जाणतो. झेक वयानं अजून लहान आहे, पण तो शिकवलेला आहे. जर मी जमिनीवर बंदूक ठेवली आणि तिची राखण करायचा त्याला हुकूम दिला, तर बंदुकीपासून तो पाऊलभरही दूर जाणार नाही."

जूमाला परत संयम धरता आला नाही :

"त्याला डोळ्यांच्या दोन जोड्या आहेत काय?"

"झेकच्या डोळ्यांवर काळे ठिपके आहेत, खोटे डोळे आहेत, शिकारीला भूल द्यायला तो त्यांचा वापर करतो."

आख्खा आठवडा आमच्या घरी पाहुण्यांचा लोंढा लागला होता : "चार डोळ्यांच्या" अद्भुत कुत्र्याला पाहण्यासाठी लोक येत होते.

## सिनेमा

मी १९३० साली जन्मलो. त्या काळात साखरेचे मोठे खडे बनवत, पण साखर दुर्मिळ होती. चहाबरोबर आई आम्हाला जर्दाळूच्या बीएवढ्या आकाराचा साखरेचा खडा द्यायची आणि नेहमी म्हणायची : "शेवटच्या कणापर्यंत खा, सांडू नका! दयाळू पक्ष्यानं आपल्याला साखर दिलीय!" चहा पिऊन झाल्यानंतर घराच्या भिंतीलगत आम्ही उन्हात बसत असू आणि दयाळू पक्ष्याची वाट बघत असू. आईला क्वचित का होईना, पण तो पक्षी दिसायचा, पण आम्हाला त्याचे एकदाही दर्शन घडले नव्हते.

वेष्टनात गुंडाळलेल्या टॉफी आम्हाला ठाऊक नव्हत्या. चांदीच्या अगर सोन्याच्या वेष्टनांची तर मुळीच माहिती नव्हती. म्हणून आमची मुले जेव्हा टॉफी अर्धवट खाऊन

फेकतात, तेव्हा आम्हाला त्यांचे वागणे समजत नाही.

सिनेमा... जेमतेम चालायला शिकलेले आधुनिक लहान पोर त्याला हवा असलेला कार्यक्रम शोधण्यासाठी टेलीव्हिजनची बटणे सहज फिरवते. पण मी शाळेत होतो तेव्हा पहिल्यांदा सिनेमा बघितला.

बैल जुंपलेली गाडी आठवते. प्रादेशिक निवडणुकांना जाण्यासाठी वडील, आई, आन्नाली-आगा, त्यांची बायको तयार होतात.

"मला घेऊन चला!" मी विनवणी करतो. "बैलगाडीतून नेलं नाहीत, तर मी तुमच्या मागून धावत येईन."

आज वडील दयाळू आहेत.

"ठीक," ते म्हणतात. "तुझी कानटोपी, उंच बूट आणि नवा ओव्हरकोट घाल."

आम्ही ग्राम-सोविएतपाशी आलो.

इमारतीशेजारीच प्रचंड कढयांमधून शूर्पा* आणि पुलाव बनवत होते. लहान मुले बिस्किटे चघळत होती, एकमेकांपाठी धावत होती. मी मुलांपाशी गेलो नाही, वडिलांपासून पाऊलभरही दूर झालो नाही. त्यांना कसलेतरी कागद देण्यात आले व त्यांनी ते कागद तांबड्या पेटीत टाकले.

"निवडणुका कशा होतात ते तू बघितलंस!" वडील उत्साहाने मला म्हणाले.

मला समजले नाही, पण परत विचारण्यास लाज वाटली. वडिलांनी माझा हात धरला व अंधाऱ्या खोलीत नेले. पांढऱ्या भिंतीवर माणसे धावत होती, तोंडे उघडत होती, ओठ हलवत होती, पण एकही शब्द ऐकू येत नव्हता.

"बाबा, ती तिथं काय ओरडत होती?" भिंतीवरून धावणाऱ्या लोकांबाबत मी वडिलांना विचारले.

"मुला, हा सिनेमा आहे. चित्रपट मुका आहे. असं म्हणतात, एव्हाना बोलणारा सिनेमा आहे. जेव्हा आपल्यापर्यंत येऊन थडकेल, तेव्हा बघू आणि ऐकू."

## सैतानी चाक

लौकरच आमच्या घरात नव्या जीवनातील एक अद्‌भुत वस्तू अवतरली. माझ्या थोरल्या भावाने "सैतानी चाक" विकत घेतले. आम्हा छोट्यांना आणि मोठ्यांना-

* शूर्पा – तुर्कमेनी राष्ट्रीय सार.

सुद्धा मोटारी म्हणजे दुर्मिळ जिवंत प्राणी भासत. त्या जवळून गेल्या म्हणजे त्यांच्यापाठी खूप वेळपर्यंत टक लावून पहात. जेव्हा मोटारी जवळून जात, तेव्हा अक्साकाल*सुद्धा आदराने थांबत.

पहिल्या दिवसांमध्ये माझा भाऊ कुणालाही सायकलला हात लावू देत नव्हता. त्याला स्वत:लाही सायकल चालवण्यात गंमत होती. मग तो आम्हाला घेऊन सायकल



फिरवू लागला. त्याची सायकल सर्वांत उत्तम बनावटीची होती आणि तिला दिवा होता.

अजूनपर्यंत आठवण आहे: जळत्या लाकडाच्या धुराचा वास येणारा वारा; दाट काळोखातून आम्ही सायकलवरून चाललोय. दिव्याचा थरथरता प्रकाश रस्त्याचा छोटा तुकडा उजळून काढतोय. उजळलेल्या रस्त्यावर हवेत धुळीचे कण चमकत आहेत आणि चिलटांच्या झुंडी प्रकाशाकडे उडत आहेत. बक्षीचा** उंच पट्टीतील मधुर आवाज मला आठवतोय.

---

* अक्साकाल – अत्यंत आदरणीय वयोवृद्ध.

** बक्षी – लोक-गायक.

आम्ही खान्जा-आगाच्या घरी चाललो होतो. बक्षीचा आवाज त्याच दिशेने येत होता.

राकेलच्या कंदिलाच्या उजेडात उंच लाकडी फलाटावर माणसे दाटीने बसली होती. फलाटाच्या मध्यभागी पुलावाच्या थाळीऐवजी किंवा शूर्पाच्या भांड्याऐवजी दास्तारखान्या*वर बक्षीचे यंत्र उभे होते – ग्रामोफोनला आऊलात त्यावेळी असे म्हणत.

तबकडी बदलताना खान्जा-आगा एखाद्या निवेदकाप्रमाणे माहिती देत: कोण कोणते गाणे म्हणतोय आणि दांडा फिरवून तबकडीवर सुई टेकवत व तळव्यांवर हनुवटी टेकवून स्तब्ध बसून रहात.

"हा अस्सल चमत्कार!" लोक एकमेकांना म्हणत. "पूर्वी कधीही जगात असलं काही नव्हतं आणि असे आश्चर्यकारक दिवस बघायला आम्ही जगलो हे केवढं सुदैव!"

## वडील

माझ्या वडिलांचे खांदे रुंद होते, चेहरा गोल होता, तांबूस दाढी होती. बाहेरून ते मंद, धीरगंभीर भासत. स्वतःचा चपळपणा आणि वेग ते लोकांपासून लपवीत. स्तेपसाठी, शिकारीसाठी आणि कामांसाठी ते त्या गुणांचा वापर करीत. माझे वडील गायी चारत.

लहानपणी मी वडिलांना क्वचित बघायचा. जेव्हा ते गायींचा कळप घेऊन जात तेव्हा मी पहाटेच्या साखरझोपेत असायचा. वडील जेव्हा घरी परतत, तेव्हा मी संध्या-काळच्या लौकर निद्रेत गुरफटलेला असायचा.

जेव्हा मी शाळेत जाऊ लागलो, तेव्हा वडिलांची मला खरी ओळख पटली. ते स्वतः जरी अशिक्षित होते, तरी त्यांनी स्वतःच्या सर्व मुलांना शिकविले. त्यांना एकच गोष्ट येत होती – स्वतःचे तांग्रीकुली नाव लॅटिन अक्षरांमध्ये लिहिणे. एवढे लिहीपर्यंत त्यांची जीभ नेहमी निळी व्हायची. वडील कॉपिंग पेन्सिलीने लिहीत. आणि प्रत्येक अक्षर काढण्यापूर्वी जिभेच्या टोकाला पेन्सिलीचा स्पर्श करीत.

मला माहीत होते: जेव्हा वडील खोकत खोकत घराभोवती फेऱ्या मारीत अथवा बसून डोक्यावरची तेल्पेक** उतरवून स्वतःचे तुळतुळीत तासलेले डोके गोंजारीत, तेव्हा

---

* दास्तारखान – तुर्कमेनी लोकांचे टेबलाऐवजीचे कापडी आच्छादन.

** तेल्पेक – केसाळ कातडी टोपी.

वडिलांची मन:स्थिती छान असल्याचे ते खात्रीलायक चिन्ह होते. खुशाल धिटाईने त्यांच्यापाशी जावे आणि कोणतीही मागणी करावी. पण जर वडील माणसाची नजर टाळत असले आणि वारंवार हात चोळत असले – तर ते बेचैन आहेत अथवा संतापलेत. अशा क्षणी त्यांच्या नजरेसमोर न येणे सर्वांत उत्तम.

खरे सांगायचे तर ही अक्कल मला पटकन आली नाही, अनुभवाने हळूहळू शिकलो.

"सैतानी चाके", फटफटचा, मोटारी, मालवाहू मोटारी, अवजड ट्रॅक्टर म्हणजे नवे वेग, नव्या प्रतिमा, नव्या आशा होत्या. शर्यतीच्या सुरेख घोड्यांबद्दल आम्ही कमी स्वप्ने बघत होतो, पण यंत्रांबद्दल जास्त स्वप्ने बघू लागलो.

याझ्ली, मी आणि माझा भाऊ, अशा तिघांनी मिळून चार चाकांची गाडी तयार केली. तिला सारथी-चक्रसुद्धा होते. आमची अद्भुत गाडी आम्ही उंच टेकाडावर नेत असू आणि बाजारापर्यंत खाली येत असू. बाजारापेक्षा दुसरी उत्तम जागा आमच्या कल्पनेत नव्हती. बाजारांमध्ये आम्ही खूप माणसे बघत असू, बाजारांमध्ये आम्हाला मिठाई आणि नवे कपडे विकत घेऊन देत.

इतर पोरांना आमच्या गाडीचा हेवा वाटायचा. आम्ही त्यांना गाडीमधून फिरवत असू, कुणालाही नकार देत नसू. पण एकदा टेकाडावर छोटा चारी आला. त्याचे वय अवघे चार वर्षे होते व आम्ही त्याला चारीष्का म्हणत असू. तोसुद्धा गाडीत बसायला मागू लागला, पण मी त्याला गाडीत बसवले नाही. गाडीचा प्रवास पूर्ण बिनधोक नव्हता – गाडी उलटण्याची, हात किंवा पाय मोडण्याची शक्यता होती.

"तुला मनाई आहे," मी म्हणालो. "प्रथम मोठा हो."

संध्याकाळी आमच्या घरी चारीचे वडील आले.

"तुझा कायूम लहान मुलांचा अपमान करतो," ते माझ्या वडिलांना म्हणाले. "त्यानं चारीला मारलं. पोरगं आत्तापर्यंत रडतंय."

मी खरी हकीकत सांगण्याचा प्रयत्न केला, पण वडिलांनी माझे ऐकले नाही. चारीच्या वडिलांदेखत त्यांनी मला झोडपून काढले. अपराध्याला शासन झाले अशी चारीच्या वडिलांची खात्री पटावी म्हणून.

चारीच्या वडिलांचे समाधान झाले आणि जाता जाता त्यांनी मला तंबी दिली:

"पुन्हा डांबरटपणा केलास तर तुझ्या पाठीची चामडी सोलून काढीन."

मला एव्हाना आठवे वर्ष चालू होते. कोर्साकला * किंवा पाठीची चामडी सोलली

---

* कोर्साक – कोल्ह्याची छोटी जात.

जाण्याला मी घाबरत नव्हतो. पण त्या दिवसाने मला खोटारडचा लोकांना भ्यायला शिकविले.

आश्चर्य म्हणजे ह्या वाईट धड्याचे पुढचे प्रकरणही तेवढेच वाईट ठरले.

गुरांच्या कोंडवाड्यापाशी सपाट मोकळे मैदान होते. शाळा सुटल्यानंतर ह्या मैदानात मुले लाप्ता* खेळायला येत. आमचा चेंडू चिंध्यांचा बनवलेला होता; तो चांगला उडायचा नाही, पण हा वेगवान खेळ सर्वांना आवडायचा.

मला क्वचित खेळात घेत, छोट्या मुलाला धुडकावून लावणे सोपे असते.

एकदा कुणी एका मुलाने शहरामधून पिवळा रबरी चेंडू आणला. चेंडू जमिनीवर आपटला म्हणजे उंटापेक्षा जास्त उंचीवर उडायचा. ह्या वेळेला मला खेळात घेतले नाही. एका बाजूला उभे राहून मी मोठ्या मुलांचा हेवा करत होतो. अचानक एका मोठ्या तडाख्यासरशी चेंडू माझ्या पायांपाशी येऊन पडला. जमिनीवरून तो उडाला आणि मी त्याला पकडले. केसाळ, चार लालभडक पट्टे त्यावर आखलेले, घट्ट, दाबता न येणारा. असा हा अद्‌भुत चेंडू माझ्या तळव्यांवर होता आणि त्याला न न्याहाळणे मला अशक्य ठरले.

"दे इकडं!" पोरे मला उद्देशून ओरडली.

"जर मला खेळात घेतलं नाहीत, तर नाही देणार!" मी उत्तरलो.

"जेव्हा तुझे पाय लांब वाढतील, तेव्हा घेऊ," पोरे उत्तरली. "दे चेंडू."

मी हात उंचावला आणि गुरांच्या कोंडवाड्यात चेंडू भिरकावून दिला.

चेंडूचा मालक माझ्याकडे धावत आला आणि त्याने माझ्या सणसणीत थोबाडीत मारले.

मला चारीष्काची आठवण झाली आणि मी घराकडे धूम ठोकली.

"बाबा!" आसवे ढाळत मी म्हणालो. "मला एक मोठा मुलगा मारतोय! चला, त्याला धडा शिकवा!"

मला वाटले होते, स्वतःच्या मुलाच्या आसवांचा सूड घ्यायला माझे वडील तात्काळ धावतील. पण वडील तसेच बसून राहिले आणि जणू काही माझे बोलणे त्यांनी ऐकलेच नाही अशा रीतीने चहा पीत राहिले.

"बाबा!" मी ओरडलो. "मला मारलं!"

"मार खायचा नसेल तर स्वतःच्या वयाच्या मुलांबरोबर खेळ, मोठ्यांमध्ये नाक खुपसू नको," वडील म्हणाले आणि त्यांनी माझ्याकडे संपूर्ण पाठ फिरविली.

मी खूप वेळ तेथे उभा राहिलो आणि निघून गेलो.

---

* लाप्ता – बेसबॉलसारखा खेळ.

# मान नसलेला उंट

एकदा वडील गुरांचा कळप हाकलत परतले होते. नेहमीप्रमाणे आईने त्यांच्यासमोर चहा आणि खाण्याचा पदार्थ ठेवले. प्यात्यातील चहा वडिलांनी एका दमात पिऊन टाकला आणि आम्हा सर्वांकडे ते बघू लागले: त्यांचा चेहरा खूप खूप थकलेला होता.

"मुला," थोरल्या भावाला ते म्हणाले, "बिनशिंगांची गाय झुडुपात अजून मागं राहिलीय. ती चिखलात रुतलीय. दोन तासपर्यंत मी तिला ओढून काढायचा प्रयत्न केला — पण जमलं नाही. चल माझ्या मदतीला."

ते जायला निघाले तेवढ्यात आमच्या घरी पाहुणे उगवले — आदरणीय पांढऱ्या दाढीचे याशुली.

याशुलींना घरात खास जागी नेऊन बसविणे, त्यांच्याबरोबर गालिचावर बसून चहा पिणे वडिलांना क्रमप्राप्त होते. म्हाताऱ्या गृहस्थांनी नम्रपणे अघळपघळ गप्पा सुरू केल्या.

"अल्लाचे आम्ही आभारी आहोत, त्याच्या औदार्याबद्दल समाधानी आहोत. त्याची कृपा होवो आणि प्रकृती चांगली राहो. वाईट नजरेपासून, दुष्ट जिभांपासून आणि क्रूर पिशाचांपासून अल्ला आपलं रक्षण करो. गेल्या काही दिवसांपासून अनेक लोकांपाठी दुष्ट पिशाच लागलंय!"

"कुणाचा ते पाठलाग करतंय?!" संभाषणात माझा थोरला भाऊ सामील झाला: गायीची सुटका करणे आवश्यक होते, पण आमचा पाहुणा, जरी तो याशुली होता, रिकामटेकड्या चकाट्या पिटण्याबद्दल प्रसिद्ध होता.

तरुणाच्या उद्दाम प्रश्नामुळे अस्वस्थ होत याशुलींनी ओठ चघळले, नाक शिंकरले, चहाचा घुटका घेतला, जिभेखाली तंबाखूची गोळी ठेवली व मगच उत्तर दिले:

"जिथं सैतानाची आग ओकणारी गाडी ठेवली आहे त्या सैतानी गुदामाजवळून रात्रीच्या वेळी माननीय चारी-आगांचा मुलगा जात होता, तेव्हा त्यानं मान नसलेला उंट बघितला. जिगित* घाबरला — अशा परिस्थितीत कोण घाबरणार नाही — आणि आजारी पडला."

"गुदामाजवळून मी पहाटे जातो, रात्री जातो, पण बिनमानेचा उंट मी कधी बघितला नाही," वडील उत्तरले.

---

* जिगित — शूर पुरुष.

त्यांचासुद्धा संयम सुटत चालला होता, पण पाहुणचाराचा नियम मोडणे त्यांना शक्य होत नव्हते. याशुलींनी तर स्वतःचा आवडता विषय नुकता कुठे सुरू केला होता.

"तांग्रीकुली-आगा," दाढी कुरवाळत ते म्हणाले, "तुला उंट भेटायचाही नाही. पिशाचं सर्वांसमोर प्रकट होत नाहीत. मी तरुणपणी त्यांना वारंवार भेटायचा. एका पिशाचाला मी बाईच्या रूपात बघितलं होतं. ती पांढरे केस विंचरत होती. अमूदार्याच्या झाडोऱ्यात हे पिशाच मी बघितलं होतं. शिवाय पिशाच-लांडगा मी बघितलाय..."

"पण कदाचित तो खरा लांडगा असणं शक्य होतं!" मी उद्‌गारलो. "आम्हाला शाळेत सांगितलंय, पिशाचं म्हणजे आजीबाईच्या गोष्टी!"

"मुला, मोठ्यांच्या बोलण्यात तोंड खुपसू नको!" वडिलांनी मला कडक तंबी दिली.

"अरे उंटाच्या पिल्ला, तुझ्या बापाचं बोलणं अगदी बरोबर आहे," याशुलींचे प्रवचन सुरू झाले. "याशुलीच्या शब्दांवर विश्वास न ठेवणं केवळ नालायक उर्मट, नम्रतेचे नियम न जाणणाऱ्यालाच शक्य आहे. जर तू एवढा धीट आहेस, तर रात्रीच्या वेळी सैतानाच्या गुदामापाशी ये. पण मला ठाऊक आहे की, तू घाबरतोस. तेवढी धिटाई यायला अजून तू लहान आहेस. गरम चूरेक*विना दुसरं तू काय बघितलंस?"

याशुलींना माझा अपमान करायची इच्छा होती. मी खूप लहान होतो, अजून घरात बायकांच्या विभागात रहात होतो आणि चूरेक भाजणे एवढेच बायकांचे काम असते, असे मला सांगण्याची त्यांना खुमखुमी होती.

"दुष्ट पिशाच उगवण्याचं कारण लोक अभद्र नदी खोदताहेत."

"तुम्ही कालव्याबद्दल बोलताय?" माझा थोरला भाऊ चिडला.

"नद्या देवानं निर्माण केल्या!" याशुली कपाळाला आठ्या घालत गरजले. "अल्लाच्या कामात लोकांनी ढवळाढवळ करू नये!"

ह्या सर्व भाकडकथांनंतर आणि प्रवचनांनंतर अखेर याशुलींनी त्यांच्या कामाचा उच्चार केला. त्यांच्या अर्धा डझन गायी कळपात घ्याव्यात अशी त्यांनी वडिलांपाशी विनंती केली. म्हातारा खूप श्रीमंत होता, नव्या जीवनाला घाबरत होता.

---

* चूरेक – तुर्कमेनी खाद्यपदार्थ.

# परीकथा

वडील आणि भाऊ गायीची सुटका करायला गेले, तेवढ्यात तोती आजी आम्हाला भेटायला आली.

आजी गालिचावर बसली न बसली तोच ताबडतोब तिने चातीवर सूत काढायला सुरुवात केली.

"प्रथम चहा प्या!" आईने आजीला चहा दिला. "लौकरच शूर्पा तयार होईल."

आणि खरोखरच वडिलांनी शिकार मारून आणलेल्या तीतर पक्ष्यांच्या साराचा वास एव्हाना नाकपुड्यांना गुदगुल्या करू लागला होता. आई चुलीपाशी गेली आणि आम्ही मुले तोती आजीपाशी बसलो. आम्हाला काय पाहिजे होते हे आजीला ठाऊक होते. तिने चाती बाजूला ठेवली आणि चहा पिऊन परीकथा सांगायला आरंभ केला. एका धूर्त कोल्हीने एका मुलाला खादाड राजास ठार मारून स्वत: राजा बनायला कशी मदत केली, ही गोष्ट तोती आजीने सांगितली. मग तिने लूकमानची गोष्ट सांगितली.

"लूकमानचा बाप खूप म्हातारा झाला," तोती आजी हळू आवाजात बोलते आणि आम्ही श्वास रोखून बसतो, "खूप खूप म्हातारा झाला आणि स्तेपमधल्या पुराण्या कायद्यानुसार दुबळ्या म्हाताऱ्या बापाला डोंगराच्या दुसऱ्या बाजूकडं नेऊन एकटे सोडणं मुलाचं कर्तव्य होतं. लोकांनी एकदा बघितलं की, भरलं पोतं घेऊन लूकमान डोंगरापलिकडं गेला आणि रिकामं पोतं घेऊन परतला. 'बापाला घेऊन गेला,' लोकांनी तर्क केला आणि त्याबद्दल ते विसरून गेले, कारण हा क्रूर रिवाज सर्वांना लागू होता. म्हातारा लूकमान लोकांवर छान औषधोपचार करायचा आणि लोकांच्या एकदम ध्यानात आलं की, तरुण लूकमानसुद्धा कोणत्याही आजारावर मुळ्या आणि मलमांनी उपचार करू शकतो. सर्व स्तेपमध्ये वैद्य म्हणून तरुण लूकमानची ख्याती पसरली. एकदा त्याला विचारले:

"'तू अजून तरुण आहेस, पण सर्व जडीबुट्या तुला कुठून ठाऊक झाल्या?' 'तुम्ही माझ्या म्हाताऱ्या बापाला खरंच विसरलात काय?' तरुण लूकमाननं विचारलं. 'माझ्या बापाला सर्व आजारांना बरं करणाऱ्या जडीबुट्या माहीत होत्या. मी बापाला मरण्यासाठी डोंगरापलिकडं घेऊन गेलो नाही. मेंढ्यांच्या जुन्या कातड्या भरलेलं पोतं मी डोंगरापलिकडं नेलं होतं. आणि माझ्या बापानं मला त्याची सर्व गुपितं सांगितली.'

"लोक विचारात पडले. लूकमानाला आणि त्याच्या दुबळ्या म्हाताऱ्याला ते हाकलून देऊ शकले असते, पण सर्व आजार बरे करणाऱ्या वैद्याविना रहायला ते भीत होते.

"आणि लूकमान टोळीचा प्रमुख बनला. लोकांना स्वत:ची लाज वाटू लागली

आणि तेव्हापासून म्हाताऱ्यांना त्यांच्या मरणापर्यंत खाऊ-पिऊ घालू लागले, त्यांचा आदर राखू लागले."

तोती आजीच्या गोष्टी मला आवडत, पण ह्यावेळी गोष्ट शेवटपर्यंत ऐकायचा दम माझ्याने धरवला नाही.

"आजी," मी विचारले, "तू पिशाच बघितलं आहेस?"

"अल्लानं दया केली!" आजी उत्तरली.

"तोती आजी, तुला काहीतरी जादू येते?" मी चिकाटी धरली.

"मला एवढंच माहीत आहे," आजी म्हणाली, "की आपल्या तुर्कमेनांमध्ये शंभर किंवा दोनशे नावं आहेत, पण सापांना हजार नावं आहेत. साप स्वतःचं नाव गुप्त राखतो. जर तुला सापाचं नाव माहीत झालं, तर तो तुझ्यासमोर डोकं झुकवून सलाम करील आणि तुझी सेवा करील."

मी आणखी प्रश्न विचारले असते, पण आई साराचे मोठे भांडे घेऊन आली. मी खाऊ लागलो, पण तोती आजीने फक्त एक-दोन चमचे सार घेतले व ती चूरेक सावकाशपणे चघळू लागली.

"मांस घ्या!" आई म्हणाली. "तीतर आहे. खूप चवदार."

"मी खाईन, खाईन," आजीने आश्वासन दिले, पण तिने मांसाला हात लावला नाही.

तेव्हा आईने स्वतः आजीला मांस वाढले व आजी खाऊ लागली. तोती आजी म्हातारी होती आणि जुने, खूप जुने रिवाज ती काटेकोरपणे पाळायची.

# साप, वारान* आणि आमचा कळप

मी आणि याझ्ली दररोज विळे घेऊन मेंढ्यांसाठी गवत कापायला जात होतो. उत्तम रसदार गवताच्या शोधात एकदा आम्ही दूरच्या कलिंगडांच्या शेतात गेलो.

कलिंगडांच्या शेतांची राखण याझ्लीचा काका, जाकूल-आगा, करीत होता. हाच तो काका, ज्याच्यापाशी "सैतानी चाक" होते.

जाकूल-आगा का कुणास ठाऊक पण खोपटात बसला नव्हता, सूर्य जरी भाजून काढत होता तरी तो खोपटाबाहेर उन्हात बसला होता.

---

* वारान – मोठा सरडा.

"श्शू:, हळू!" जेव्हा आम्ही गवताने भरलेली पोती जमिनीवर फेकून त्याच्या-जवळ गेलो, तेव्हा तो दबत्या आवाजात म्हणाला. "खोपटात साप आहे! कुणापासून तरी निसटून जायला तो माझ्या खोपटात घुसलेला दिसतोय. गप्प बसा, बघू पुढं काय घडतंय!"

जाकूल-आगा चुकला नव्हता: भयंकर फूत्कार टाकत एक वारान खोपटात धावला. सापाने शेपूट आपटली, झेप मारली, पण वाराननं त्याला पकडून खेचायला सुरवात केली. आम्ही सावधपणे मागून जात होतो. वाराननं सापाचा कणा चावला व त्याला ठार मारले. तेवढ्यात त्याने आम्हाला बघितले. तो पळू लागला, पण आम्ही त्याला पकडले व खुंटाला वासरू दोरीने बांधतात तसे त्याला बांधले. वारानसमोर आम्ही मांस टाकले. वाराननं मांस खाल्ले.

जाकूल-आगा कचेरीत गेला व आम्ही खोपटाच्या सावलीत आडवे झालो, भरपूर टरबुजे खाल्ली आणि वारानला न्याहाळत बसलो. तो सुटून कसा जाईल हे आम्हाला बघायचे होते, पण अचानक वाळूच्या ढिगामागून आणखी एक वारान धावून आला. दोरीने बांधून ठेवलेल्या वारानवर तो चालून गेला, त्याच्या कुशीचा त्याने चावा घेतला व धूम ठोकली.

आमच्या वारानच्या मदतीला आम्ही धावलो. त्याच्या जखमेमधून खूप रक्त वाहिले, म्हणून आम्ही त्याला घरी आणले, आयोडिन माखले आणि खोक्यात ठेवले. दिवसातून दहा वेळा आम्ही खुद्द आणि मोठी माणसेसुद्धा त्याला खाऊ घालत होतो. लौकरच वारान बरा झाला. आम्हाला वाटत होते की, आता तो आम्हाला सोडून जाणार नाही; पण खोका वरती उचलताच वाराननं गवतावर उडी मारली, आमच्यापासून तो दूर पळाला, आमच्या दिशेने त्याने संतापाने दात विचकले व तो नाहीसा झाला.

माझ्यासाठी आणि याङ्लीसाठी मोठ्या माणसांनी एक काम शोधून काढले. माझ्या वडिलांप्रमाणे आता आम्हीसुद्धा गुराखी बनलो होतो. मात्र आमची जनावरे लहान होती – बोकड आणि मेंढ्या. त्यांची संख्या कमी होती: सतरा डोकी. शाळेनंतर आम्ही माझ्या वडिलांच्याच वाटेने आमचा कळप हाकलत नेत होतो. आणि अस्सल धनगरां-प्रमाणे बरोबर खाण्याच्या शिदोऱ्या बांधून नेत होतो: चूरेक, टरबूज अथवा कलिंगड.

आम्ही सशस्त्रसुद्धा होतो. याङ्लीपाशी कंपास होता आणि माझ्यापाशी पक्षी कोरले-ल्या मुठीचा पेन्सिल तासायचा चाकू होता. अर्थात गुराख्यांच्या वाकड्या काठ्या होत्याच.

आम्ही जनावरांना "जंगलात" नेत होतो – नदीजवळच्या झाडोऱ्यात. झुडुपांखाली रसदार गवत वाढले होते.

नदी आमची साथी होती. आमच्या बोकडांना आणि मेंढ्यांना नदी ओलांडून जाणे शक्य नव्हते, तरीही त्यांना शोधण्याचे प्रसंग वारंवार यायचे. एकदा आम्ही चूरमेनेक नावाच्या एडक्याविना घरी परतलो. रात्रीच्या वेळी "जंगलात" त्याचा शोध घ्यायला आम्ही घाबरत होतो आणि एडक्याचा आसपास सुगावा लागत नव्हता. अंधारातून कळप हाकत आम्ही येत होतो, जरी खांद्याला खांदा लावून चालत होतो तरी मोठ्यांदा बोलत होतो. जंगली पशूंना आम्ही तसे घाबरवत होतो.



दुसऱ्या दिवशी सकाळी मी शाळेत गेलो नाही. गाढवावर बसून हरवलेला एडका शोधायला निघालो. रोगोझी नावाच्या दाट झुडुपांच्या देठांमध्ये चूरमेनेकचे मागचे पाय अडकले होते. डोके खाली करून पडलेल्या अवस्थेत तो मला आढळला. त्याचा श्वासोच्छ्वास जेमतेम चालला होता. झुडुपांभोवती कोल्ह्यांच्या पावलांचे अनेक ठसे होते. स्पष्ट दिसत होते की, भीतीपायी चूरमेनेक झुडुपातून सुटायला जोरात धडपडला होता आणि भित्रे कोल्हे त्याच्यावर तुटून पडायला घाबरले होते. मी चाकूने देठ छाटले आणि एडक्याला क्लोवेरच्या कुरणावर घेऊन गेला. खरे तर असे करणे चुकीचे होते, पण मला वाटले की, तशी भयानक रात्र अनुभवलेल्या चूरमेनेकला चवदार भरपूर खाण्याचा हक्क होता.

भरपूर खाल्ल्यानंतर उपकारांची परतफेड म्हणून चूरमेनेकने मी व याझ्लीने मिळून वनस्पतींच्या दांडोऱ्यांपासून बनविलेल्या खोपटावर हल्ला चढविला. त्याची धडक एवढी जोरदार होती की, आमचे खोपट क्षणात कोसळून पडले.

## रानडुकर

दास्तारखानप्रमाणे समोर रुमाल पसरून आम्ही मांड्या घालून जमिनीवर बसलोय. टरबुज खातोय. आमचे बोकड आणि मेंढ्या शांत चरत आहेत. आमच्या प्रदेशात क्वचित पडणारा शारदीय पाऊस नुकताच पडून गेलाय. जमीन पुन्हा हिरवी बनतेय. वसंताचा गंध सुटलाय. मी व याझ्ली बसलोय आणि मोठ्या माणसांप्रमाणे सावकाशपणे, काळजीपूर्वक शब्द निवडत, आयुष्यातील समस्यांबद्दल चर्चा करतोय. झाडोऱ्यात कुठेतरी बंदुकीचा बार वाजला.

"बहुधा, तुझे वडील!" याझ्ली म्हणाला.

"असतील कदाचित."

"तुझे वडील छान मेर्गेन * आहेत, कुटुंबाला फार मोठा फायदा."

"अर्थात!" मी सहमत झालो. "मांस विकत घ्यायची गरज नाही. मेंढीला कापण्याऐवजी तिच्यापासून कळप वाढवायला आम्ही तिचा उपयोग करू शकतो."

"लोक म्हणतात, तुझे वडील पाखराच्या डोळ्याचा नेम धरू शकतात. एका गोळीत दोन-तीन तीतर मारतात. खरं?"

"माहीत नाही. वडील शिकारीबद्दल बोलत नाहीत, पण तुझ्या वडलांना ते

---

* मेर्गेन – शिकारी.

सांगत होते तेव्हा मी ऐकलं : जर शिकारी एका गोळीत दोन तीतर ठार मारत असेल, तर तो अस्सल शिकारी."

"त्यांच्या बंदुकीत किती काडतुसं मावतात?"

"बाबांची एकनळी बंदूक आहे. म्हणजे एक काडतूस. जर त्यांना दुनळी बंदुकीची गरज पडली, तर ते नक्की विकत घेतील."

आणि याझ्ली एकदम ओरडला. आमच्या अगदी जवळ झुडुपे खसखसली.

आम्ही ताडकन उभे झालो. आमचे बोकड आणि मेंढ्या गवत चरायचे थांबले, पण पटकन शांत झाले. मी घाबरलो :

"लांडगा तर नसेल?"

"ए!" याझ्ली ओरडला आणि काठी फिरवत झुडुपांकडे धावला. आणि एकदम त्याने मागे उडी घेतली. "कायूम, इथं कुणीतरी फुरफुरतंय!"

मी भीतीवर मात केली, स्वतःची काठी उचलली आणि याझ्लीपाशी गेलो. त्याच क्षणी झुडुपांमधून एक प्रचंड रानडुकर धावून आला. तो आमच्याजवळून सुसाट धावत गेला, लव्हाळी काडकाड मोडली व शांतता पसरली. एवढ्यात वडिलांचा आवाज मी ऐकला :

"झेक! झेक!"

कुत्रा धावत आला आणि तोसुद्धा लव्हाळ्यांमध्ये घुसला.

"बाबा!" मी ओरडलो.

"कायूम?" परत झुडुपे खसखसली आणि वडील आमच्यापाशी धावत आले. "तुम्ही ठीक आहात?"

"हो!" आम्ही चकित झालो.

"रानडुकर कुठाय? मी त्याच्यावर गोळी घातलीय, जखमी अवस्थेत तो खूप धोक्याचा आहे."

लव्हाळ्यांमधून कुत्रा भुंकू लागला. वडिलांनी खांद्यावर बंदूक टाकली व ते निघाले. आम्ही बार होण्याची वाट पहात होतो, पण वडील लौकरच परतले आणि बंदूक त्यांच्या खांद्यावरच होती.

"खलास! जखम जिव्हारी होती!" वडिलांनी आमची डोकी कुरवाळली. त्यांचे हात किंचित कापत होते.

"वोलोशिन-आगापाशी जाऊ?" मी विचारले.

"पळा पोरांनो, मी तुमच्या कळपाची राखण करतो."

आम्ही आऊलात वोलोशिन-आगाकडे धाव घेतली. रानडुकर म्हणजे खरे तर डुकरच, पण आऊलात आम्ही डुकराचे मांस खात नसू. वडील क्वचित रानडुकराची

शिकार करीत. पण एकदा त्यांनी प्रचंड रानडुकरीण मारली आणि तिचे धड वोलोशिन-आगांना दिले. त्यांनी मांस धुरावले आणि शहरात विकले. विक्रीतील निम्मे पैसे त्यांनी रुमालात गुंडाळून आणले व माझ्या वडिलांना दिले. वडिलांनी पैसे घेतले नाहीत. वोलोशिन-आगांनी रुमालाची गुंडाळी चुलाण्यावर ठेवली व ते निघून गेले. कुणीही त्या गुंडाळीला हात लावला नाही, पण वोलोशिन-आगांनी दुसऱ्या धुडाचे पैसेही तेथे आणून ठेवले.

आमच्याकडे करवसुलीचे अंमलदार येईपर्यंत गुंडाळी तशीच पडून होती. वडिलांनी पैशांसकटचा रुमाल अंमलदारांना दाखविला व आवश्यक ती रक्कम घ्यायला सांगितली. खुद्द वडिलांनी त्या पैशांना मुळीच स्पर्श केला नाही.

## शहरात

रविवारी वडिलांनी मला झोपेतून उठविले तेव्हा अजून अंधार होता. आम्ही हिरवा चहा प्यायलो, गाढवावर बसलो आणि शहराकडे निघालो.

हिवाळा होता आणि आमच्या उष्ण तुर्कमेनीयात हिवाळ्यात काहीवेळा खूप गोठणारी थंडी पडते. जेव्हा वारा वाहतो, तेव्हा गोठवणारी थंडी आपल्या नख्या बाहेर काढते.

जरी मी वडिलांच्या पाठीशी बसलो होतो, तरी माझे कान व हात थंडीमुळे दुखू लागले. मी टोपीच्या दोऱ्या सोडून कान झाकले, पण माझ्यापाशी हातमोजे नव्हते. एका हाताने वडिलांना धरून दुसरा हात कोटात उबवत होतो.

अखेर आम्ही शोरमायदान ह्या खाऱ्या सरोवरापर्यंत पोहोचलो.

"बाबा," न राहवून मी म्हटले, "माझ्यासाठी बाजारात हातमोजे विकत घ्या!"

"ठीक आहे, मुला. जर तुला खूप थंडी वाजत असेल, तर थांबू आणि शेकोटी पेटवू."

पण शहर पहायची मला खूप घाई झाली होती, म्हणून मी म्हणालो:

"मला मुळीच थंडी वाजत नाही."

उजाडले. हवेत हिमकण भिरभिरत होते.

"अर्ध्या वाटेपर्यंत पोहोचलोय," वडील म्हणाले, "मला बर्फाची केव्हाच चाहूल लागली होती. जर खूप हिमवर्षाव झाला, तर बाजार भरणार नाही."

समोर उंच टेकाड दिसत होते.

“हा आन्नाकुली तेपे किल्ला,” वडिलांनी खुलासा केला.

आम्ही परत मुकाटपणे प्रवास करू लागलो.

जोवर स्तेपमधून जात होतो, तोवर मी संयम धरला, गप्प राहिलो; पण जेव्हा केर्कीमध्ये आलो, तेव्हा मात्र फाटक्या पोत्यामधून दाणे सांडावेत तसे माझ्या तोंडून प्रश्न भराभरा सांडू लागले.

माझी कल्पना होती: शहरात प्रत्येक घरात दुकान आहे, शहरवासी खिडक्यांपाशी बसून पांढरे बनपाव आणि हलवा खातात.

“बाबा,” मी घाबरून विचारले, “शहरात गाढवावर बसलेलं चालतं?”

“चालतं,” वडील म्हणाले.

आणि खरोखरीच, आमच्या आऊलाप्रमाणे एकमजली घरे असलेल्या केर्कीतील रस्त्यांवरून दुचाकी बैलगाड्या फिरत होत्या व गाढवे दचकत होती.

आम्ही आमच्या लांबकान्यावर बसून शहराच्या दुसऱ्या टोकाशी राहणाऱ्या वडिलांच्या मित्राकडे – शिकारी झोराबायकडे – गेलो.

झोराबाय नव्या घराच्या पायात सीमेंट ओतत होते.

“हं! चिकणमाती ह्याच्याशी स्पर्धा करू शकणार नाही,” सीमेंटच्या थंड राखी लादीला पायाने टोकरीत वडील म्हणाले. “चांगलं जगायला सुरवात करतोय. सर्व करायला आपल्यापाशी सत्ता आहे.”

मग आम्ही बाजारात गेलो. वडिलांनी दारूची भुकटी व शिसे विकत घेतले; माझ्यासाठी हातमोजे, रबरी चेंडू आणि गोष्टींचे पुस्तक विकत घेतले. मग आम्ही दुकानांमधून फिरलो, टॉफी आणि सुंठीची बिस्किटे विकत घेतली व घरी परतलो.

केर्की – मी पाहिलेले पहिले शहर.

## युद्ध

पुढच्या माझ्या आठवणी म्हणजे खूप खूप खोल अंधारा खड्डा. पुढे – युद्ध.

पहिला दिवस स्पष्ट आठवतो.

सकाळीच शेतात पाणी सोडायला मी कालव्याकडे गेलो होतो. मग रेशमाच्या किड्यांसाठी तुतीच्या काही डहाळ्या मी कापल्या. आमच्या आऊलात रेशमाच्या कोशांची पैदास असत.

डोक्यावर गाठोडे घेऊन जेव्हा मी घरी जात होतो, तेव्हा याझ्ली मला भेटला.

"कायूम! युद्ध सुरू झालं!" तो ओरडला.

"छान," मी म्हणालो. "आपल्या लाल सैनिकांना पदकं मिळतील."

याझ्लीने जमिनीवर पाय आपटले.

"मूर्ख! आता सर्वांचं वाईट होईल. युद्धात सत्तरपासून सात वर्षांपर्यंतच्या सगळ्यांना घेऊन जातील."

"कुणी सांगितलं?"

"मुल्लानं. घरी जाशील तेव्हा समजेल."

याझ्ली एवढा कशाला घाबरला होता हे मला समजले नाही. आम्ही जवळ जवळ दररोज लढाईचा खेळ खेळत होतो. सर्वांत मजेदार खेळ.

आमच्या घरी याझ्लीची आई व आणखी काही शेजारी जमले होते. सर्व रडत होते.

वडिलांकडे मुल्ला भेटायला आले होते. मुल्ला म्हणाले:

"जर्मन फार लढाऊ लोक आहेत. त्यांनी एव्हाना दहापेक्षा जास्त देशांचा कबजा केलाय. त्यांना विरोध करू शकेल असा एकही देश नाही."

आवाज न चढविता वडील उत्तरले:

"मुल्ला-आगा, जर्मनांनी अनेकांवर विजय मिळवला असेल, पण आपला ते पराभव करू शकणार नाहीत."

"अरे माझ्या मुला, तू हे काय बोलतोस!" मुल्लांनी हात उडविले. "जिंकून घेतलेल्या माणसांना जर्मन स्वतःपुढं रेटत आणताहेत. काळ्या ढगात जेवढे पावसाचे थेंब, तेवढे त्यांच्या सैन्यात सैनिक आहेत."

"आपल्यापेक्षा त्यांची संख्या जास्त नाही!" वडील म्हणाले.

"आपण अल्लाला राग आणला म्हणून हे सारं घडतंय!" मुल्ला मोठ्यांदा ओरडले. "हरकत नाही, जर्मन येतील आणि नीट व्यवस्था लावतील."

"मुल्ला-आगा, जर्मन इथं येतील अशी आशा तू फार बाळगू नकोस. आपल्या जमिनीपासून हजारो किलोमीटर अंतरावर जर्मनांचा पाडाव होईल."

आमच्या कुटुंबाला व वडिलांना शिव्याशाप देत मुल्ला निघून गेले, पण त्यांच्या शापांनी माझे बालपण हिरावून घेतले नाही. युद्धाने माझे बालपण माझ्यापासून हिरावले.





# फाटकी हुर्जून

आरस्लान आजोबांकडे बघत होता. रहिम-आगा झाडावर पिकलेले जर्दाळू गोळा करीत होते. आजोबा धिप्पाड, पण फळे छोटी. शिवाय आरस्लान मुंग्या बघत होता. मुंगी छोटी होती, पण ती सुकलेल्या गवताचे खूप मोठे पाते वाहून नेत होती.

"आजोबा! आजोबा!" आरस्लानने हाक मारली.

रहिम-आगा नातवापाशी आले.

"बघितलंत?" मुलाने मुंगी दाखविली. "एवढं मोठं गवताचं पातं ती कुठं घेऊन जातेय?"

आजोबांनी स्मित करीत आरस्लानच्या डोक्यावर हात ठेवला.

"माझ्या उंटाच्या पिलाला समजेल की, मुंग्या जगात सर्वांत जास्त उद्योगी आहेत. मुंग्यांचं वारूळ बांधायला किंवा खाण्यासाठी गवताचं पातं वापरलं जाईल. हिवाळा येईल, जमीन गोठून जाईल, पण मुंगीला भीती नाही. तिच्या घरात ऊब असेल आणि तिला पोटभर खायला मिळेल."

"तर मीसुद्धा काम करीन," आरस्लान म्हणाला. "म्हणजे हिवाळ्यात आपलं घर उबदार राहील आणि खायला पोटभर मिळेल."

"छान, उंटाच्या पोरा! चांगला विचार केलास," रहिम-आगांनी कौतुक केले. "ही घे बादली, खाली पडलेले जर्दाळू वेच."

आजोबा व नातू एकत्र काम करू लागले.

रहिम-आगांनी आरस्लानच्या बादलीत डोकावून पाहिले व ते खूष झाले:

"शाबास माझ्या उंटाच्या पोरा! जवळ जवळ बादलीभर जर्दाळू गोळा केलेस. आज एवढं पुरे. जा, हात धू आणि आयगूल मावशीकडं जाऊ या."

"ती कुठं राहते?"

"आऊलात."

"आऊल कुठाय?"

"पोचशील तेव्हा बघशील."

"कशावरून जायचं?"

"माझ्या फटफटीवरून."

"तांबड्या?"

"तांबड्या."

"कोण चालवणार?"

"मी चालवीन."

"मी साईड-कारमधून येऊ?"

"होय."

आजोबांनी नातवाला साईड-कारमध्ये बसविले, त्याच्या पायांपाशी जर्दाळूंनी भरलेली बादली ठेवली आणि लौकरात लौकर इंजिन सुरू केले, कारण फाटक्या हुर्जून-मधून सांडल्याप्रमाणे आरस्लानचे प्रश्न भराभरा पडत होते.

ह्या प्रवाशांना निरोप देण्यासाठी घरातून मेन्ली-एजे आजी बाहेर आली. रहिम-आगांना इंजिन बंद करावे लागले व नातवाला जेव्हा फटफटीवरून बसवून नेतो तेव्हा कसे वागले पाहिजे ह्याबाबतचे अनेक सल्ले आजीकडून ऐकून घ्यावे लागले. आरस्लानचे आई-वडील शहरात शिकत होते व आजी आजोबांशी आणि नातवाशी कडक वागायची.

## प्रत्येक प्रश्नाला उत्तर असतेच असे नाही

रस्ता शेतांजवळून गेला होता आणि शेतांमध्ये ज्येष्ठमधाची मुळे लोक गोळा करीत होते.

ट्रॅक्टर स्वतःबरोबर नांगर ओढत होता, पण गव्हाची अथवा कापसाची लागवड करताना वापरतात तसला नांगर नव्हता. एका पात्याचा हा खास नांगर होता. तो जमिनीत खूप खोल घुसत होता आणि ज्येष्ठमधाची मुळे उपटत होता.

कामगार ही मुळे गोळा करीत होते, माती झाडून त्यांना स्वच्छ करीत होते व त्यांचे ढीग रचत होते.

"कशासाठी ही मुळं?" आरस्लानने आजोबांना विचारले.

"माणसांच्या उपयोगासाठी," रहिम-आगा उत्तरले. "ज्येष्ठमधाच्या मुळयांपासून वेगवेगळी औषधं बनवतात, टॉफीमध्ये आणि बीयरमध्ये त्यांना मिसळतात. खोकल्यावरचं औषध प्यायला आहेस?"

"हो. खूप चवदार."

"त्याचं कारण ते ज्येष्ठमधापासून बनवलं आहे."

"आपल्या ज्येष्ठमधापासून?"

"होय."

"मला माहीत नव्हतं!" आरस्लान चकित झाला.

फटफटी दाट झाडीत शिरली. लौकरच झाडीचा पट्टा संपला व रस्ता पुन्हा सपाट बनला.

"आजोबा! आजोबा!" आरस्लान ओरडला.

"काय पाहिजे तुला?" वेग कमी करीत रहिम-आगांनी विचारले.

"त्या डोंगरावर चला."

रहिम-आगांनी दूरच्या निळसर डोंगररांगांकडे बघितले.

"नाही, नातवा. तिथं आपण जाऊ शकणार नाही. खूप उंच आणि चढ आहे."

"डोंगरावर ते काळं काय आहे?"

"आर्चा* वाढतेय. आर्चाची राई."

"कुणी लावलं त्याला?"

"निसर्गानं त्याची लागवड केली."

"निसर्ग तिथपर्यंत कसा पोचला?"

रहिम-आगांनी आश्चर्याने डोके मागे वळविले, ते हसले आणि पुन्हा त्यांनी वेग वाढविला.

फटफटी जोरात आवाज करीत धावू लागली आणि रस्त्यालगतच्या झुडुपांचे एकच एक हिरव्या रेषेत रुपांतर झाले.

## . उत्तम मित्र

रहिम-आगा आऊलात पूर्ण दोन दिवस पाहुणचार झोडत होते. दोन्ही दिवस आरस्लान आगील**पाशी घोटाळत होता. गुरे डोंगरात आणि स्तेपमध्ये उन्हाळी कुरणांमध्ये

* आर्चा – जूनिपरचे झाड.

** आगील – गुरांचा गोठा.

गेली होती. आगीलमध्ये फक्त एक बकरी आणि तिचे राखी रंगाचे छोटे पिलू उरले होते. छोटया करडाच्या कपाळावर पांढरा तारा होता.

छोटया करडाला पाहताच आरस्लान ताबडतोब त्याच्यापाशी गेला. क्लोवरची एक जुडी त्याने उपटली व गोठयाच्या दांडयांमध्ये ती धरून तो हाका मारू लागला :

"म्ये हे हे-म्ये हे हे!"

करडालासुद्धा मुलगा खूप आवडला होता. त्याने डावी-उजवीकडे उडया मारल्या, धावत गोल फेरी मारली आणि आरस्लान जेथे त्याची वाट पहात उभा होता, तेथे एकदम येऊन ते थबकले. मुसकट पुढे ताणून त्याने क्लोवरची जुडी घेतली व परत ते उधळले.

"ए!" इतर पोरे आरस्लानला हाक मारीत होती. "आमच्यापाशी ये!"

पण मुलांशी खेळण्याची आरस्लानची इच्छा नव्हती. त्याला करडाबरोबर खेळायचे होते.

जेव्हा रहिम-आगा परतीच्या प्रवासाला सज्ज झाले, तेव्हा आरस्लान त्यांना आगील-पाशी आढळला. मुलगा स्वतःच्या नव्या मित्राला चूरेकचे तुकडे चारत होता.

"उंटाच्या पोरा, आपली जायची वेळ झाली!" रहिम-आगांनी नातवाला हाक मारली.

"आजोबा, आपण करडू बरोबर घेऊन जाऊ या?" आरस्लान म्हणाला. "फटफटी भक्कम आहे."

"फटफटी भक्कम आहे हे खरं, पण करडू खूपच लहान आहे," रहिम-आगांनी नातवाला विरोध केला. "ते अजून आईच्या दुधावर वाढतंय. थोडं मोठं होऊ दे. पुढच्या वेळी घेऊन जाऊ. चला."

"नाही आजोबा!" आरस्लान ठामपणे म्हणाला. "मी माझ्या मित्राला सोडून जाणार नाही. तुम्ही जा माझ्याशिवाय."

"असं कसं!" रहिम-आगा चकित झाले. "आपण घरातून एकत्र बाहेर पडलो होतो आणि आता एकटा परत जाऊ? तुझी आजी मला घराच्या उंबरठयात घेणार नाही."

तेवढयात आयगूल मावशी आगीलपाशी आली.

"भाचेबुवा, जर मामला असा आहे," ती म्हणाली, "तुला करडू बक्षीस देते आणि शिवाय बूबेन्चिक*. पुढच्यावेळी येशील तेव्हा करडू घेऊन जा."

---

* बूबेन्चिक – छोटी घंटा.

"आयगूल मावशी!" आरस्लान हात उडवीत ओरडला. "असं कसं तुला समजत नाही? माझ्या उत्तम मित्राला मी सोडून जाऊ शकत नाही."

"आयगूल, पोराचं म्हणणं बरोबर आहे!" रहिम-आगा म्हणाले. "बकरीला आणि करडाला, असं दोघांनाही घेऊन जायला आम्हाला परवानगी देतेस? नंतर बकरी परत आणून देऊ."

"आजोबा, किती छान कल्पना सुचली तुम्हाला!" आरस्लानने टाळ्या पिटल्या. "आयगूल मावशी, तू आमच्याबद्दल काळजी करू नको! फटफटीचं इंजिन भक्कम आहे. ते आम्हा सर्वांना वाहून नेईल."

"तुमच्या मनाप्रमाणं होवो!" आयगूल मावशी स्मित करीत म्हणाली. "पण जोवर करडू लहानाचं मोठं होईल, तोवर बकरीला चारण्याचं काम तू केलं पाहिजेस, कारण करडासाठी तिला खूप दूध असलं पाहिजे. जमेल तुला?"

"जमेल!" खात्री पटविण्यासाठी आरस्लानने उंच उडीसुद्धा मारली. "जमेल, जमेल! आमच्याकडं भरपूर गवत आहे. आमच्याकडं गवत एवढं उंच आहे की मी त्यात लपून जातो."

आयगूल मावशीने घरातून लाल फितीला अडकवलेली बूबेन्चिक आणली व करडाच्या गळ्यात बांधली.

करडाने उडी मारली — बूबेन्चिक खणखणली. करडू आगीलमध्ये धावले आणि बूबेन्चिक सुरेख खणखणली. एका दगडावरून दुसऱ्या दगडावर उड्या मारणाऱ्या डोंगरी ओढ्याचा असा आवाज होतो.

## उडणारा साप

करडू फांदीची पाने तोडत होते. बकरी गवत खात होती. एकदा ती स्वतःच्या करडावर नजर टाकत होती आणि एकदा छोट्या माणसावर.

बकरी खूष होती: करडू आणि मुलगा खट्याळपणा करीत नव्हते. ते महत्त्वाच्या कामांमध्ये गुंतले होते. फांदीची पाने कशी तोडावीत ते करडू शिकत होते. त्याचा मित्र आरस्लान काहीतरी बांधत होता.

आरस्लानला वाटत होते की, बकरीची आणि करडाची तो राखण करीत होता. पण प्रत्यक्षात तो मुंग्यांसाठी रस्ता बांधत होता.

जिवंत मुंग्यांचा रस्ता गवतावर एका अदृश्य टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत पसरला

होता. मुंग्या कुठून कुठे धावत होत्या हे आरस्लानला मुळीच समजले नाही. पण त्याला वरून दिसत होते: मुंग्या निष्कारण वाकड्या वाटेने जात होत्या आणि त्या सर्व जड ओझी वाहून नेत होत्या. आरस्लानने एक मुंगी उचलली व स्वतःच्या रस्त्यावर ठेवली. पण मुंगीने त्याचे ऐकले नाही. धावत धावत ती पूर्वीच्या वाटेवर गेली. दुसऱ्या मुंगीनेही आरस्लानचे ऐकले नाही. आणि तिसरीनेसुद्धा.

तेव्हा मुलग्याने मुंग्यांच्या वाटेत खड्डा खणला. आता त्यांना वळण घेऊन जाऊ



दे व त्यांची वाट सरळ होऊ दे. पण तसे घडले नाही! मुंग्या खड्डयात उतरत होत्या आणि मोठ्या कष्टाने त्यातून स्वत:ची ओझी वाहून नेत होत्या.

"हात् तुमची!" आरस्लान मुंग्यांना म्हणाला.

त्याने खड्डयावर लाकडाचा एक तुकडा ठेवला. मुंग्यांना पूल मिळाल्याबद्दल आनंद झाला. त्यांचे काम जोरात चालू झाले.

आरस्लानने मुंग्यांचा नाद सोडला आणि तो कामाला लागला. आजी मेन्ली-एजे म्हणाली होती की, हिवाळयासाठी चारा साठवून ठेवायची. वेळ झाली. बकरीला आणि तिच्या पिलाला चारायला नेताना आरस्लान नेहमी एक छोटी थैली घेऊन जायचा. आत्तासुद्धा त्याने तुतीची गळून पडलेली पाने व फांद्या गोळा करायला आरंभ केला.

एकदम गवतामधून साप उठला! त्याने पंख फडफडवले आणि परत तो गवतावर पडला.

आरस्लानने थैली फेकली, पण तो पळाला नाही. त्याला भास तर झाला नाही? थरथरत्या पंखांनी साप जमिनीवरून उडाला आणि परत गवतावर पडला.

आरस्लानने धूम ठोकली.

"आजोबा! आजोबा!" घराकडे धावताना तो ओरडत होता. "तिथं! तुती-पाशी!"

"कोण आहे तिथं? लांडगा? कोल्हा?" काठी शोधत आजोबांनी विचारले.

"नाही! तिथं उडणारा साप!"

"उंटाच्या पोरा! सापाला पंख नसतात!"

"पण मी बघितले! प्रत्यक्ष माझ्या डोळयांनी बघितले. साप पंख फडफडवत होता."

आजोबांनी काठी बाजूला ठेवली व ते विचारात पडले.

"नाही नातवा, हा उडणारा साप नव्हे. सापाच्या तावडीत सापडलेला हा पक्षी आहे. असं मी अनेकदा पाहिलंय."

"पक्ष्याबद्दल मला वाईट वाटतं," आरस्लान म्हणाला.

"अर्थात वाईट वाटतं," रहिम-आगा म्हणाले.

ते दोघेही गप्प उभे राहिले, कारण पक्ष्याची सुटका करायला आता उशीर झाला होता.

# कासव

करडाला चारायला नेणे आरस्लानला खूप आवडायचे.

ज्येष्ठमधाच्या मुळ्या गोळा करणाऱ्यांच्या वस्तीत अनेक छोटे धनगर होते. पोरांना स्वत:ची करडे, बकरे, वासरे आवडत आणि झाडोऱ्यातील सर्वांत हिरव्या मैदानांवर त्यांना ती चारायला नेत.

त्या दिवशी पोरांनी आपले लहान प्राणी अमूदार्याच्या किनाऱ्यावर चारायला नेले होते.

आरस्लानच्या करडाने खेळता खेळता सापाराच्या करडाला धडक मारली व ते किनाऱ्यालगत धावले. अमूदार्या फसवी नदी आहे. ती किनारे धुवून काढते आणि करडाला पाण्यापासून दूर पळवायला आरस्लान धावला. धावताना त्याला दगडाची ठेच लागली व तो खाली पडला.

त्याने दगडाकडे बघितले. दगडाला डोके आणि पाय होते!

आरस्लान घाबरून मागे सरला.

"घाबरू नको!" सापार त्याला ओरडून म्हणाला. "ते कासव आहे! त्याच्या-पासून काही अपाय होत नाही. त्याला घरी घेऊन जा. तुमच्या अंगणात ते फिरेल."

"माझ्या करडाकडं लक्ष ठेव, सापार!" आरस्लानने विनंती केली. "मी आजोबांना कासव दाखवायला जातो."

रहिम-आगा द्राक्ष्याच्या मळ्यात सावलीत बसून हिरवा चहा पीत होते.

"उंटाच्या पोरा, तू काहीतरी जिंकून आणलेलं दिसतंय!"

"आजोबा, हे कासव आहे."

"कासव मी बघतोय!"

"ते म्हातारं आहे?"

"नाही, उंटाच्या पोरा! तुझं कासव तरुण आहे. कासवं शंभर वर्षं जगतात. मी तुला कधीतरी कासवाचं अंडं दाखवीन."

"कासव कोंबडीसारखं असतं?" आरस्लानला आश्चर्य वाटले.

"कासव म्हणजे कोंबडी नव्हे, पण तेसुद्धा अंडी घालतं."

"कासवाची अंडी कशी असतात?"

"वेगवेगळ्या प्रकारची. काही कोंबडीच्या अंड्यांसारखी दिसतात, पण जरा लहान असतात. कासवाचं अंडं तुझ्या हातात मावेल. काही अंडी रेशमी किड्यांच्या कोशा-सारखी दिसतात."

"आजोबा!" आरस्लान ओरडला. "मला छोटं कासव पाहिजे."

"अवघड आहे!" रहिम-आगा म्हणाले. "कासवाची पिल्लं अंड्यातून बाहेर पडताच ताबडतोब वाळूत खड्डा खणून लपतात आणि पुढच्या वसंताच्या मोसमापर्यंत बाहेर पडत नाहीत. सप्टेंबरात ती अंड्यातून बाहेर पडतात आणि सारा शरद व हिवाळा वाळूत पुरून घेऊन वसंताच्या उबदार दिवसांची वाट पाहतात."

"मी छोटं कासव शोधून आणेन!" आरस्लान रागाने पाय आपटत म्हणाला.

आजोबांनी डोके हलविले.

"नाही, उंटाच्या पोरा, नाही! कासवाची अंडी शोधणं सोपं नाही. कासवीण त्यांना वाळूत पुरते आणि त्यांच्याभोवती जादूचं कुंपण घालते. हे कुंपण तोडता येईल, पण त्यासाठी कासवाच्या जिभेखाली असतो तसा चिमटा पाहिजे."

"तुम्ही कासवाचं अंडं कसं शोधाल?" आरस्लानने विचारले. "जीभ दाखवा! तुमच्या जिभेखाली चिमटा आहे?"

"नाही उंटाच्या पोरा!" रहिम-आगा हसले. "जादूचा चिमटा माझ्यापाशी नाही, पण मी अक्साकाल आहे. म्हाताऱ्यांचा आदर करतात आणि त्यांच्यावर विश्वास ठेवतात."

"का?"

"तसं पूर्वीपासून चालत आलंय, नातवा. मला माहीत नाही."

"पण मला माहीत आहे!" आरस्लान टाळ्या पिटत म्हणाला. "अक्साकालांचा आदर आणि मान राखतात, कारण ते शहाणे असतात."

"वाहवा, आरस्लान!" रहिम-आगा खूष झाले. "शाबास तुझ्या डोक्याची!"

# तामदीर*साठी सर्पण

"आजोबा, मी मुलांबरोबर सर्पण गोळा करायला जाऊ?" धावत आल्यामुळे धापा टाकणाऱ्या आरस्लानने उंबरठ्यावरूनच विचारले.

रहिम-आगांनी नातवावर पायांपासून डोक्यापर्यंत करडी नजर टाकली व स्मित केले.

"वा, आमच्याकडं छान मेंदतनीस तयार झाला. आजी काल म्हणत होती की, चूरेक भाजण्यासाठी लौकरच घरात सर्पण उरणार नाही, तामदीरचं सर्पण संपलंय. शाबास, आरस्लान! घराची, माझी आणि आजीची काळजी घेतोस हे फार छान!

---

* तामदीर – चूरेक व इतर प्रकारचे पाव भाजण्यासाठी घराजवळची लोखंडी गोल शेगडी.

सर्पणासाठी जायला मी तुला परवानगी देतो, मात्र इतर मुलांपासून फार मागं राहू नको आणि पाव बरोबर घेऊन जा: काम करणाऱ्याला पाव उपयोगी पडतो."

आरस्लानने पाव घेतला, दोरी घेतली व तो पळाला.

गळयात घंटी बांधलेले करडू त्याच्या जोडीने धावत होते.

मुले प्रथम वाळुंजीच्या झाडीकडे गेली, पण तेथे वाळक्या काटक्या फारच कमी होत्या.

"आपण नदी ओलांडून बेटावर जाऊ या!" सर्वांत थोरल्या यागमूरने सुचविले. तो एव्हाना सात वर्षांचा झाला होता आणि त्याला शरदाच्या मोसमात शाळेत जायचे होते.

पायउताराच्या जागी पाणी उथळ होते. आरस्लानच्या गुडघ्यांपर्यंत.

"ब्यॅ-हॅं-हॅं!" करडू बेंबाटले आणि त्याची आनंदी बूबेन्चिक केविलवाणी वाजली. पाण्यात उतरायला ते घाबरत होते.

"बूबेन्चिक, ये, भिऊ नको!" बेटाच्या किनाऱ्यावर उडी मारत आरस्लानने हाक मारली.

"ब्यॅ-हॅं-हॅं!" करडू उत्तरादाखल ओरडले.

"त्याला उचलून आणलं पाहिजे," यागमूर म्हणाला, "ते स्वतः पायउतारावरून येणार नाही."

"येईल!" आरस्लानने पैज लावली. "त्याला दोनदा हाका मारीन आणि ते धावत येईल."

"तू त्याला शिकवलं आहेस?" यागमूरचा विश्वास बसला नाही आणि त्याने हाक मारली: "बूबेन्चिक!"

करडाने ह्या हाकेवर मानसुद्धा वळविली नाही.

"आणि तू म्हणतोस..." यागमूर हसला.

"ते फक्त आरस्लानचं ऐकतं," सापार म्हणाला. "आरस्लान, तू हाक मार!"

"बूबेन्चिक! बूबेन्चिक!" आरस्लान ओरडला. करडाने पाण्यात उडी घेतली आणि दोन ढांगांमध्ये ते बेटावर पोहोचले.

"कमाल आहे!" मुले म्हणाली. "आरस्लान, तू आमचा प्राणिशिक्षक आहेस."

बेटावर किनाऱ्यालगत छान मळलेली पायवाट गेली होती. मुले ह्या वाटेवरून तुरेदार झांडीजवळून गेली, हिरव्या लव्हाळयांजवळून गेली.

लौकरच ती मोकळ्या मैदानात आली. इथे नदीने वसंतात अनेक डहाळ्या, मुळ्या आणि गवतांना किनाऱ्यावर आणून फेकले होते.

"पोरांनो, अशा सर्पणावर पुलाव मस्त शिजतो!" यागमूर खूष झाला.

"तामदीर पेटवता येईल?" आरस्लानने काळजीच्या स्वरात विचारले.

"अर्थात!"

मुले काटक्यांचे भारे बनवू लागली. अचानक आपल्या मालकापाशी उभे असलेले करडू दचकून मागे सरले व डोके खाली घालून फुरफुरू लागले.

"साप!" सर्पण जमिनीवर फेकत आरस्लान ओरडला.

"अरे, नाही!" यागमूर हसू लागला. "हा साधा गवती साप आहे. घाबरू नको, धीटपणं काटक्या गोळा कर."

मुलांनी लाकडांच्या मोळ्या बांधल्या व खाण्यासाठी ती गोलाकार बसली. जवळ-जवळ प्रत्येकापाशी पाव अथवा चूरेक होता आणि ज्याच्यापाशी नव्हता, त्याला इतरांनी दिला.

अचानक पायवाटेवर एक गाढव उगवले.

"चला, त्याला पकडू आणि त्याच्या पाठीवर मोळ्या लादू!" यागमूर म्हणाला.

मुले तात्काळ तयार झाली.

त्यांनी गाढवाला गराडा घातला, पण गाढवाची पळून जाण्याची मुळीच इच्छा नव्हती.

"कुणाचं आहे गाढव?" आरस्लानने विचारले.

"वाट चुकलेलं असावं!" यागमूर म्हणाला. "प्रथम त्याच्या पाठीवर गवत घालू आणि नंतर सर्पणाच्या मोळ्या ठेवू."

जादा दोरी सापडली. काटक्यांची मोठी मोळी बनवून सर्वांनी मिळून गाढवाच्या पाठीवर लादली आणि त्याला नदीकडे मुले हाकू लागली.

पायउतारापाशी ती आली आणि चकित झाली. पाणी चढले होते, गढूळ आणि घाण बनले होते.

"आता नदी कशी ओलांडायची?" आरस्लान घाबरला.

"पोहत जाऊ. कोण येतोय माझ्याबरोबर?" यागमूर धिटाईने म्हणाला.

मुलांनी एकमेकांकडे नजरा टाकल्या व ती नदीपासून मागे सरकली. पाण्याचे पात्र तीस मीटरपर्यंत पसरले होते.

"तूच पोहून जा," सापार यागमूरला म्हणाला. "मोठ्या माणसांना बोलावून आण, आम्ही इथं बसून राहतो."

"मला एकट्याला भीती वाटते," यागमूरने कबुली दिली. "पाण्याला फार ओढ आहे."

"मग आपण काय करायचं?" आरस्लानने स्वतःच्या करडाला मिठी घातली.

सर्व मुले मागे वळली व सूर्याकडे बघू लागली. सूर्य मावळतीवर झुकला होता. तेव्हा चर्चा न करता ती मोठ्यांदा ओरडू लागली, कुणा मोठ्या माणसाच्या कानी त्यांचा ओरडा ऐकू जावा अशा हेतूने.

पण त्यांच्या ओरडण्याला कुणीही प्रतिसाद दिला नाही.

"बेटावर रात्र काढायची खरंच आपल्यावर पाळी येणार काय?" सापार म्हणाला.

"चला, आणखी ओरडू, मात्र सगळे एकदम!" यागमूर म्हणाला.



मुले एकसुरात ओरडली, एकेकटी ओरडली; वडिलांना, भावांना, मातांना त्यांनी हाका मारल्या.

आणि बेटाच्या खोल भागातून फावडे घेतलेला एक माणूस त्यांच्या ओरडण्यामुळे तेथे आला. तो बैराम-आगा होता.

"इथं तुम्ही कसे आलात?" त्याने मुलांना विचारले.

"आम्ही सर्पण गोळा करायला आलो होतो!" यागमूरने सर्वांच्या वतीने उत्तर दिले.

"तुमच्या बाजूला सर्पणाचा तुटवडा आहे काय?" बैराम-आगा रागावून म्हणाला आणि एकेक मुलाला उचलून त्याने दुसऱ्या किनाऱ्यावर नेऊन सोडले. तो साक्षात महा-

प्रचंड बाहुबली होता. मुलाला खांद्यावर उचलून घ्यायचा, त्याची सर्पणाची मोळीही उचलायचा. जेव्हा आरस्लानची पाळी आली, तेव्हा आरस्लान, त्याची मोळी व त्याचे बूबेन्चिक, अशा तिघांनाही उचलून त्याने नदी ओलांडली.

मग बैराम-आगाने गाढवाच्या पाठीवरची लाकडे काढली, पायउतारावरून आणून दिली आणि गाढवाला बेटाच्या खोल भागात हाकत तो निघून गेला.

# कोल्ह्याची शिकार

दुसऱ्या दिवशी करडासहित आरस्लान यागमूरच्या घरी आला व मित्राला रस्त्यावर बोलावू लागला.

"यागमूर! बाहेर ये!"

यागमूर बाहेर आला.

"बघितलीस?" स्वतःच्या छातीवर बोट दाखवत आरस्लानने विचारले.

त्याच्या छातीवर अस्सल लष्करी दुर्बीण लटकत होती.

"मी प्राण्यांचं निरीक्षण करावं म्हणून आजोबांनी ही मला दिलीय. चल, एकत्र बघायला जाऊ."

"कुठं?"

"नदीवर, जिथं माणसं नाहीत."

"आई!" घरात डोकावून यागमूर ओरडला: "मी सर्पण आणायला जातो."

ते तिघे: यागमूर, आरस्लान व बूबेन्चिक – वाळुंजीच्या झाडीकडे निघाले. मुले झाडीत आडवी पडून लपली आणि करडू चरायला गेले.

दुर्बीणीतून प्रथम यागमूर बघत होता – त्याला गीझ पक्षी दिसले. मग आरस्लान बघू लागला – त्याला काहीही दिसले नाही.

यागमूरने परत दुर्बीण घेतली.

"बघ, जंगली बदक!"

आरस्लानने दुर्बीण डोळ्यांना लावली: "हे कुठलं बदक! हा कोल्हा." आणि तो पूर्ण चकित झाला:

"चेंडूसकट! चेंडूसकट कोल्हा!"

"कुठं बघितलास तू कोल्हा?" यागमूरने दुर्बीणीसाठी हात पुढे केला. पण आरस्लानने दुर्बीण दिली नाही.

"थांब! कोल्हा चेंडू ढकलतोय!"

यागमूरने आरस्लानच्या हातून दुर्बीण खेचून घेतली.

"बरोबर, कोल्हा! त्याने साळिंदराला नदीत ढकललं." आता आरस्लाननं यागमूरकडून दुर्बीण खेचून घेतली.

"कुठं? काही दिसत नाही! बदक दिसतंय!"

"तांबड्या झुडुपावर बघ!"

"बरोबर! साळिंदर दिसतंय. किनाऱ्याकडं पोहतंय! आय्!" आरस्लानने दुर्बीण फेकली व तो रडू लागला.

"काय झालं?" यागमूरने दुर्बीण उचलली. "अरे दुष्ट कोल्ह्या! साळिंदराला त्यानं खाल्लं!"

"धाव लौकर, त्याला वाचवू!" आरस्लान ताडकन उठला.

"आता वाचवणं शक्य नाही! आपण तिथं पोचेपर्यंत साळिंदराच्या फक्त सुया उरलेल्या असतील."

"भिकार दुर्बीण!" आरस्लान खूप चिडला होता.

"मुळीच भिकार नाही. कोल्हा शिकार कशी करतो हे आपण पाहिलं."

"चल घरी. आजोबांना मी बंदूक ठासायला सांगतो. कोल्ह्याला मारण्यासाठी."

"साळिंदराबद्दल वाईट वाटतंय," यागमूरने कबुली दिली. "पण कोल्ह्याबद्दल-सुद्धा वाईट वाटेल."

आरस्लानने विचार केला व सुस्कारा टाकत म्हटले:

"कोल्ह्याबद्दलसुद्धा वाईट वाटेल!"

# शिक्षा मिळालेला चोर

कालव्यावर पाय सोडून आरस्लान बसला होता, चिकणमातीपासून आकृत्या बनवीत होता. तुतीच्या झाडाच्या पालवीने मुलावर सूर्यापासून सावली घातली होती. बूबेन्चिक जवळच होते. पुढचे पाय झाडावर टेकवून ते खालच्या फांद्यांची पाने कुरतडत होते.

अचानक तुतीवरच्या चिमण्यांनी चिवचिवाट केला, ज्येष्ठमधाच्या झुडुपांमध्ये भटकणाऱ्या कोंबडीच्या पिलांनी कलकलाट केला.

आरस्लान चकित झाला. त्याने इकडेतिकडे बघितले आणि झाडाच्या जाड फांदीवर एक फार मोठा नसलेला, पण भयंकर दिसणारा पक्षी बसत असलेला पाहिला. त्याची चोच बाकदार होती.

आणि एकदम शांतता पसरली. चिमण्या स्तब्ध झाल्या, ज्येष्ठमधामध्ये कोंबडीची पिले लपली.

"हाट्!" आरस्लान ओरडला आणि आगंतुक पाहुण्यावर त्याने चिकणमातीची आकृती भिरकावली.

पक्ष्याने पंख फडफडवत उड्डाण केले.

चिमण्या परत चिवचिवू लागल्या, कोंबडीची चपळ पिले बागडू लागली, कलकलू लागली.

आरस्लान अर्थातच आजोबांपाशी धावला.

"मी काय बघितलं माहीत आहे? एक भयंकर पक्षी! एवढं मोठ्ठं नाक! कोंबडीची पिलं लपली, चिमण्यांचा आवाज हरवला."

"बहुधा बहिरीससाणा आला असावा," रहिम-आगांनी निर्णय घेतला. "छोटे पक्षी स्तब्ध बसले, म्हणूनच वाचले. असं म्हणतात की, गरुड आकाशामधून जमिनीवर सरपटत जाणारी मुंगी बघू शकतो, पण स्तब्ध बसलेला उंट त्याला दिसत नाही. बहिरीससाणासुद्धा बहुधा स्तब्ध लक्ष्य बघू शकत नसावा. पण एखादं कोंबडीचं पिलू धावू लागलं असतं, तर हिंस्र पक्ष्यानं ताबडतोब त्याच्यावर झडप घातली असती."

रहिम-आगांनी दुर्बीण घेतली – दुर्बीण ते नेहमी जवळ बाळगायचे – आणि आकाश न्याहाळले.

"इकडं ये बघू!" आजोबांनी नातवाला बोलावून दुर्बीण दिली. "प्रथम वाळुंजीवर बघ, मग जरा वरती. हा पक्षी आला होता?"

"मला वाटतं, हाच."

"त्याचं शास्त्रीय नाव मला माहीत नाही. जुनी माणसं ह्या पक्ष्याला 'प्रेषिताचा घोडा' म्हणतात."

"आजोबा, बघा, काय चाललंय!" दुर्बीण परत देत आरस्लान ओरडला. "'प्रेषिताच्या घोड्या'ला मारताहेत!"

"निळे कावळे त्याच्यावर तुटून पडलेत. त्यानं बहुधा त्यांचं पिलू चोरलं असावं. बघ, आता ते चोराला कशी अद्दल घडवतील."

आरस्लानने दुर्बीणीच्या भिंगांवरील चाक फिरवून नजर रोखली.

"पंखांनी मारताहेत. आजोबा, त्यानं काहीतरी खाली टाकलं."

"कावळ्याचं पिलू सोडलं. सोडणार नाही तर काय करणार? कावळ्यांच्या पंखांचे तडाखे जोरदार असतात. मी लहान होतो तेव्हा कावळ्यांचं घरटं काढून घ्यायला झाडावर चढलो होतो. त्यांनी मला जबरदस्त झोडपलं. म्हणून लोक त्यांना 'प्रेषिताचा चाबूक' म्हणतात."

"किती मजेदार!" आरस्लान म्हणाला. "आजोबा, आपण दोघांनी मिळून प्राणी बघायला केव्हा जायचं? तुम्ही नेहमी म्हणता: आणखी थोडा मोठा हो, आणखी थोडा मोठा हो. बघा, आता मी मोठा झालोय!"

रहिम-आगांनी आरस्लानकडे बघितले व कबुली दिली.

"खरं आहे. तू खूप मोठा झालास. आजीकडं तामदीरसाठी सर्पण आणून देतोस. तुझ्या मनासारखं होऊ दे. उद्याच जाऊ."

"कलिंगडांच्या शेतात?" आरस्लानचे डोळे चमकू लागले.

"कलिंगडांच्या शेतात! गुरांना फारा दिवसात बघितलं नाही. मी प्रवासाची तयारी करतो आणि तू जाऊन आजीला सांग, आपल्यासाठी ताजे चूरेक भाजायला."

"करडाला बरोबर घेऊ?"

"घेऊ!" रहिम-आगांनी संमती दिली.

# आर्ना *

रहिम-आगा, आरस्लान व बूबेन्चिक नदीच्या प्रवाहालगत चालू लागले. मग पाऊल-वाट त्यांना वाळुंजीच्या झाडीत घेऊन गेली आणि जेव्हा झाडी संपली, तेव्हा नदी एव्हाना दूर राहिली होती. पण थेट त्यांच्या समोर तळापर्यंत पारदर्शी असलेले आर्नाचे निळे पाणी चमकत होते.

आर्ना हे खास सरोवर आहे. ते मूळ प्रवाहातील पाणी घेते, गोलाकार वळण घेते आणि पुन्हा नदीत कोसळते. आर्नातील प्रवाह अगदी पुसट असतो आणि गाळाने भरलेले अमूदार्याचे पाणी आर्नात निवळते व जणू झऱ्याच्या पाण्याप्रमाणे ते स्वच्छ आणि पारदर्शी बनते.

गेल्या काही वर्षांत अमूदार्या मागे मागे हटत गेली व आर्ना आणि नदी यांच्या दरम्यान मोठे बेट तयार झाले. ज्येष्ठमध गोळा करणाऱ्यांच्या वस्तीतील लोक ह्या बेटावर स्वतःची गुरे चारायला नेत व गाळाच्या सुपीक मातीत कलिंगडांची लागवड करीत.

झुडुपांची दाटी झालेल्या किनाऱ्यापाशी रहिम-आगा, आरस्लान आणि बूबेन्चिक थांबले.

आर्नाच्या दुसऱ्या किनाऱ्यापासून मोटारबोट निघाली. इंजिन घरघरत होते आणि

---

* आर्ना – सरोवर.

काही मिनिटांनंतर किशोरवयीन मोटारबोटवाल्याने आदरपूर्वक रहिम-आगांना सलाम केला, तीनही प्रवाशांना मोटारबोटीत बसविले व आर्नामधून कलिंगडांच्या शेतांकडे तो निघाला.

"त्या तिथं यंदा आम्ही मोठा मासा धरला!" लव्हाळयांची दाटी झालेल्या जागेकडे बोट दाखवत मोटारबोटवाला ओरडला.

"इंजिन बंद कर! ऐकू येत नाही!" रहिम-आगा म्हणाले.

मोटारबोटवाल्याने इंजिन बंद केले. बोट एकदम खाली बसली आणि आर्नावर शांतता पसरली.

"मी म्हणतोय यंदा आम्ही इथं मोठा मासा धरला. १२ किलोग्राम वजनाचा!"

"छान! जाळयात पकडलात?" रहिम-आगांनी विचारले.

"नाही, गळानं. त्यांनी लव्हाळयांमध्ये अंडी घातली होती. ह्या माशांची अंडी दोऱ्यावर काळे मणी ओवल्यासारखी दिसतात, एका लव्हाळयापासून दुसऱ्या लव्हाळया-पर्यंत लटकलेली आणि खुद्द आई-बाप जवळपास पहारा देत असतात. आम्ही छोटा मासा धरला, गळाच्या आकडयाला अडकवला आणि खाडीत टाकला. मासा तडफडू लागला, पाणी गढूळ झालं आणि मोठा मासा धावून आला. आगंतुक पाहुणा त्याची अंडी गट्ट करील अशी त्याला भीती वाटली. मागचा पुढचा विचार न करता त्यानं छोटा मासा धरला – आणि आमच्या तावडीत सापडला. आम्ही होडीत होतो आणि त्यानं आम्हाला सबंध आर्नाभर ओढत नेलं. थोडक्यात निसटायच्या बेतात होता."

"तू इथं आम्हाला उतरव!" रहिम-आगा म्हणाले. "आम्ही पुढं पायी जातो."

बेटावर तुरेदार गवताचे उंच पुंजके वाढले होते. दुरून त्यांचे फुलार तुरे भटक्यांच्या तंबूंची आठवण करून देत होते. तुरेदार गवतामध्ये अंजिराच्या झाडांचे लाल शेंडे डोकावत होते.

"आय्!" आरस्लान घाबरून ओरडला. "आय्! आय्!" पुढच्याच क्षणी तो आनंदाने ओरडला.

पायांखालून तीतर पक्षी फडफडत वर उडाले. जणू जमिनीखालून मौल्यवान रत्नांचे कारंजे उसळावे तसे.

"जोकूर! जोकूर!" त्यांचे घाबरट, पण मोहक चीत्कार उमटले.

"आजोबा! आजोबा!" आरस्लान ओरडला. "आपण इथं आलो हे किती छान!"

आजोबांनी स्मित करीत मुलाच्या खांद्यावर हात ठेवला, आरस्लानने बूबेन्चिकच्या मानेवर हात ठेवला आणि बेटावरचे चमत्कार बघत ते पुढे निघाले.

"बघ, बोरू कसा आहे!" रहिम-आगांनी नातवाला दाखविले. "त्याच्यापासून

छान चटई बनवता येईल. पण आजकाल हे काम कुणी विशेष करत नाही."

अगदी जवळून ससा धावत गेला.

"आजोबा, गेल्या वर्षी इथंच तुम्ही सशांना वाचवलं होतं ना?"

"वाळुंजीचा तो उतार बघितलास? गेल्या वसंतात सशांवर संकट कोसळलं. पाणी सबंध बेटावर पसरलं. वाळुंजीपाशी सगळे ससे गोळा झाले. पण पाणी सारखं वर चढत होतं. आम्ही त्या सशांना पोत्यात भरलं, पाणी ओलांडून दुसऱ्या बाजूला आणलं आणि पोती सोडताच बाणासारखे सारे पसार झाले."

तुतीच्या जुन्या झाडाच्या कोसळलेल्या बुंध्याने प्रवाशांचा मार्ग अडविला.

"थोडं बसू इथं आणि आर्नाचा आवाज ऐकू," रहिम-आगा म्हणाले.

आरस्लान बसला आणि बूबेन्चिकने स्वतःचा उद्योग सुरू केला – झुडुपांची पाने कुरतडण्याचा. पाणी हळूच चुबुक चुबुक आवाज करीत होते, जणू किनाऱ्याशी गुज-गोष्टी करीत होते.

# बाहेरून हिरवे, आतून लाल

कलिंगडांच्या शेताच्या टोकाला रडणाऱ्या वाळुंजींच्या कोवळया झाडांखाली चार खांब रोवलेले होते. वाळलेल्या लव्हाळयांच्या जुडी लावून दोन भिंती उभ्या होत्या आणि वाऱ्यापासून आडोसा मिळावा म्हणून दगडांच्या आधाराने चटईचे छप्पर होते.

"पोचलो आपण मुक्कामावर!" आडोशामधील सावलीत जमिनीवर अंथरलेल्या जुन्या नमदी गालिचावर खाली बसत रहिम-आगा म्हणाले. "तहान लागलीय. उंटाच्या पोरा, एक कलिंगड आण."

वाळुंजीखाली पहुडलेले बूबेन्चिक आरस्लानपाठी धावण्यासाठी उठले, पण पोरग्याने हात झटकून त्याला दटावले.

"पडून रहा! मी लांब जात नाही."

बूबेन्चिकने आज्ञापालन केले, पण जेव्हा आरस्लान परतताना दिसला, तेव्हाच ते निजले.

"आजोबा! बघा केवढं मोठं आहे! जेमतेम उचलून आणलं."

त्याने कलिंगड जमिनीवर ठेवले आणि आडोशात ढकलले.

"बघा, आजोबा!" वाळलेल्या देठाला आरस्लानने दाखविले. "चिचुंद्री-किडयानं पोखरलाय."

"इथं तसले किडे खूप आहेत," आजोबा म्हणाले. "इथं काय करावं समजत

नाही. देठ आणि मुळं पोखरून हे किडे एका बाजूनं नाश करतात, पण त्यांच्यापासून फायदेही खूप होतात."

"कोणता फायदा होतो?" आरस्लानला आश्चर्य वाटले.

रहिम-आगांनी सुरी बाहेर काढली आणि धूर्तपणे डोळे किलकिले करीत नातवाकडे बघितले.

"ओळख पाहू: बाहेरून हिरवं, आतून लाल कोण?"

"कलिंगड!" आरस्लान पटकन म्हणाला, पण त्याच्या डोळ्यांमध्ये एकदम भीती दाटली. "पण आत ते पांढरं असलं तर?"

"शक्य नाही!" रहिम-आगा म्हणाले आणि कलिंगडाला मधोमध कापून त्यांनी त्याचे दोन तुकडे केले. "बघ, आगीसारखं लाल आहे. पण गरम नाही, गोड आहे. पहिला तुकडा तुला – खाऊन बघ!"

आरस्लानने लाल कोर घेतली, तिचा चावा घेतला व डोळे गच्च मिटून घेतले.

"मधापेक्षा जास्त गोड!" तेवढ्यात त्याला स्वतःच्या मित्राची आठवण झाली. "आजोबा, बूबेन्चिकला दिलं पाहिजे. त्यालासुद्धा तहान लागली असणार."

गोड कलिंगडाचा बूबेन्चिकलासुद्धा स्वतःचा वाटा मिळाला. बूबेन्चिकने घंटी वाजवून पसंती व्यक्त केली.

"आजोबा, तर चिचुंद्री-किड्यापासून फायदा कोणता ते सांगा ना!" आरस्लानने आठवण करून दिली.

"फायदा असा – कधी कधी बघतोस, अंकुर छान फुटतात, पण मग एकदम काही कोमेजू लागतात, काही तर कात्रीनं कापल्याप्रमाणं दिसू लागतात. आपल्या जमिनीमुळं असं होतं. तिच्यात मीठ आहे. मातीतलं पाणी खोल जमिनीतलं मीठ वर उचलतं आणि वनस्पती मरू लागतात. दुसरं संकट – सूर्य फार गरम आहे. इथं वनस्पतींना जगायला चिचुंद्री-किडे मदत करतात. ते जमिनीखाली बोगदे खणतात, त्यामुळं जमिनीत हवा जाते आणि माती समृद्ध बनते. अशा जमिनीत श्वासोच्छ्वास करणं वनस्पतींना सोपं ठरतं. स्वतःचे बोगदे खणताना चिचुंद्री-किडे अगदी निपुण अभियंत्यांसारखं काम करतात. ते बोगदे सरळ खणतात. वाटेत मूळ आडवं आलं तर कापतात, झाड आलं तर कुरतडतात. जर चिचुंद्री-किड्यांची संख्या फारच वाढली, तर कोकिळा शेतकऱ्यांच्या मदतीला धावते. कोकिळेच्या दृष्टीने हे किडे म्हणजे मिष्टान्न. इतर पक्षी ह्या किड्यांची सहज शिकार करू शकत नाहीत, पण कोकिळेला साक्षात जमिनीमधून ते दिसतात. चोचीच्या दोन-तीन घावांमध्ये ती किड्यांच्या बोगद्यापर्यंत पोहोचते आणि नेमकी त्यांना टिपते."

आरस्लानने कलिंगड खाल्ले आणि शेकोटी पेटविण्यासाठी काटक्या गोळा करायला तो धावला. आजोबांनी अरुंद तोंडाचे भांडे घेतले व पाणी आणायला ते गेले.

## चोखंदळ खादाड

"पाणी गरम होतंय तोवर कलिंगडांच्या शेतात जाऊ या," रहिम-आगा म्हणाले. "कलिंगडं पिकलीत. टरबुजं बघू आणि मुख्य म्हणजे चिनी ऊस कसा वाढलाय ते पाहू."

कलिंगडांच्या शेताभोवती चिनी उसाची भिंत उभी होती. जमिनीपासून तीन मीटरपर्यंत उंच झुबकेदार दांडे उभे होते. हे जिवंत कुंपण अनाहूत पाहुण्यांपासून संरक्षण करणारे होते. चिनी उसाच्या तुऱ्यांचे दाणे बाजरीची आठवण करून देतात.

रहिम-आगांनी मधाळ चिनी ऊस लावला होता. ह्या उसाच्या दांड्यात गोड साखरेचा रस असतो. एके काळी हा ऊस लहान मुलांचा आवडता होता, पण पुढे साखर व टॉफी मुबलक मिळू लागली आणि मधाळ चिनी उसाचा लोकांना विसर पडला.

रहिम-आगांना ह्या विसरलेल्या वनस्पतीचा पुनर्जन्म करायची इच्छा होती व एका म्हाताऱ्यापाशी त्यांना ह्या उसाचे फक्त एक झाड मिळाले. तीन वर्षांच्या अवधीत त्यांनी मधाळ चिनी उसाची संख्या भरपूर वाढविली आणि आता सामुदायिक शेताला त्याचे बियाणे देण्याचे स्वप्न ते पहात होते.

रहिम-आगांनी ऊस न्याहाळला व निर्णय घेतला:

"पीककापणीची वेळ झालीय. दाणा पिकलाय आणि पाखरं वेळ वाया घालवणार नाहीत."

"आजोबा, बघा!" आरस्लानने जमिनीवरून टरबुजाची साल उचलली. "टरबुजं चोरताहेत!"

"ती पिकल्याची ही हमखास खूण आहे!" रहिम-आगा हसून म्हणाले.

"कुणी खाल्लं असावं? आणखी एक साल! बहुधा रानडुकराचं काम आहे!"

"जर रानडुकर आला असता, तर त्यानं सारी टरबुजं तुडवली असती. आपली टरबुजं कोल्हा खातोय. तो मोठा खादाड आहे. वासावरून तो सर्वांत छान पिकलेलं टरबुज निवडतो आणि चोखंदळपणानं खातो."

"अरेच्चा, परत हा वाईट कोल्हा!" आरस्लान ओरडला. "त्यानं साळिंदराला गट्ट केलं आणि आता आपली टरबुजं खातोय. आजोबा, त्याच्यासाठी सापळा लावा."

"कोल्हा सापळ्यात सापडायचा नाही. दुसरंच एखादं निष्पाप जनावर सापडेल

आणि मरेल. त्यापेक्षा बुजगावणं उभं करू. कोल्हा माणसाला बघताच पळून जाईल."

त्यांनी तसेच केले. चहा पिऊन झाल्यानंतर वाळक्या वेळूला तोडून कोल्ह्यांना घाबरविणारे बुजगावणे त्यांनी उभे केले.

# तीन अंगठ्यांची लांडगीण

सूर्यास्ताबरोबरच आजोबा व नातू झोपायला आडवे झाले. बूबेन्चिकने वाळुंजीखाली बैठक मारली.

दिवसभरातील घटना आरस्लानने आठवल्या व हा दिवस त्याच्या आयुष्यातील सर्वांत उत्तम दिवस होता असे त्याला भासले. तो आणि आजोबा आज अस्सल प्रवासी बनले होते.

एकदम जवळच कुठेतरी जोरदार कोल्हेकुई निनादली. करडाच्या गळयातील घंटी घाबरून खळखळली.

"बूबेन्चिक! बूबेन्चिक!" आरस्लानने हाक मारली.

बूबेन्चिक आडोशात आले आणि स्वतःच्या मित्रापाशी निजले. आरस्लानने त्याच्या शिंगांच्या मधोमध खाजविले व तो कुशीवर वळला. तेवढ्यात त्याने डोळे उघडले.

"आजोबा! कोल्हे आपल्यावर हल्ला करणार नाहीत?"

"नाही, उंटाच्या पोरा! ते घाबरट असतात."

"आजोबा, जर लांडगे आले?"

"लांडगे उन्हाळयात माणसावर हल्ला करत नाहीत."

"तुम्हाला आठवतं, तीन अंगठ्यांच्या लांडगिणीची गोष्ट तुम्ही मला सांगितली होती. पुन्हा सांगा."

"आता झोप. तुला सकाळी लौकर उठवीन."

"आजोबा!" आरस्लानने विनवणी केली. "तुम्ही फक्त लांडगिणीची गोष्ट सांगा. मग दुसरी गोष्ट सांगण्याचा हट्ट मी धरणार नाही."

"ठीक आहे," रहिम-आगा कबूल झाले. "खूप पूर्वीची ही हकीकत आहे."

"किती वर्षांपूर्वीची?"

"तेव्हा आपली वस्ती नव्हती, शाळा नव्हती, ट्रॅक्टर नव्हते, मोटारी नव्हत्या."

"आणि सायकली?"

"आणि सायकलीसुद्धा नव्हत्या. तेव्हा मी खास शाळेत जात होतो. तिथं म्हातारे, तरुण आणि लहान मुलं असे सगळे शिकत. त्या काळात आमच्या आऊलमधल्या एकाही

माणसाला लिहा-वाचायला येत नव्हतं. आमची शाळा दुसऱ्या आऊलात होती आणि खूप लांब रस्त्यावरून चालत जावं लागायचं. आम्ही आडवाटेनं येत असताना एकदा तीन अंगठ्यांच्या कुत्र्याचे अथवा लांडग्याचे ठसे बघितले. आमच्या आऊलात तीन अंगठ्यांचा कुत्रा नव्हता. काही काळानंतर दोन पोरं तीतरांच्या शिकारीला निघाली आणि वेळूच्या वनात त्यांना लांडग्यांचे बीळ दिसले."

"त्या बिळात लांडग्याची तीन पिलं होती!" आरस्लान म्हणाला.

"बरोबर. पिलं मोठी होती. त्यांना उचलायला पोरं घाबरली आणि आऊलात धावत आली. ही बातमी लोकांमध्ये पसरेपर्यंत, शस्त्रास्त्रं घेऊन ते निघेपर्यंत लांडगीण आणि तिची पिलं पसार झाली. पण दुसऱ्याच दिवशी आगीलमधून कोकरू नाहीसे झाले. मग मेंढा नाहीसा झाला. त्यानंतर काही मेंढ्या गायब झाल्या."

"आजोबा! तीन अंगठ्यांच्या लांडगिणीनं दहा गलेलठ्ठ मेंढे पळवून नेले," आरस्लानने निवेदकाची चूक दुरुस्त केली.

"बरोबर, उंटाच्या पोरा! तसंच झालं. शिकाऱ्यांनी लांडगिणीचा खूप शोध घेतला, पण त्यांना ती सापडली नाही. मग धनगर लोकांना म्हणू लागले, लांडगिणीला निष्कारण घाबरवलं. जोवर ती आऊलाबाहेर रहात होती, तोवर तिनं पाळीव गुरांना धक्का लावला नव्हता. ती स्तेपमध्ये शिकार करत होती. पण लांडगीण शहाणी होती. मेंढवाड्याच्या फटी तिला उत्तम माहीत होत्या आणि जेव्हा स्तेपमध्ये ती आपल्या पूर्ण वाढलेल्या पिलांना घेऊन गेली, तेव्हा खुद्द आऊलात शिकार करायला तिनं आरंभ केला. ती फार चतुराईनं शिकार करायची."

"तर ती कधीच सापडली नाही," आरस्लानने आजोबांची हकीकत पूर्ण केली.

"बरोबर उंटाच्या पोरा, तिला पकडलं नाही. आता झोप."

आरस्लान ह्या कुशीवरून त्या कुशीवर वळला, अधिक सोयीस्कर निजला व गप्प झाला. पण झोपला नाही. त्याला काहीतरी फुटल्याचा विचित्र आवाज ऐकू आला. तो आवाज साक्षात जमिनीवरून धावत गेला. कधी एका जागी फुटल्याचा आवाज, तर कधी दुसऱ्या जागी. आरस्लान हातांच्या कोपरांवर उठला व अंधारात निरखून बघू लागला. आग दिसत नव्हती. कदाचित कोल्हे दबून येत होते अथवा त्याहून वाईट – धूर्त लांडगे.

"आजोबा, तुम्ही ऐकताय?" आरस्लानने विचारले.

"ऐकतोय, उंटाच्या पोरा. ही टरबुजं फुटताहेत. पिकलीत."

आरस्लानने स्मित केले, तो आडवा झाला आणि हसऱ्या चेहऱ्याने झोपी गेला.

# साळू

"ऊठ, आरस्लान!"

मुलाने डोळे उघडले. सूर्य तळपत होता. बूबेन्चिकची घंटी वाजत होती. करडू केव्हाचे चरत होते, झुडुपांची पाने कुरतडत होते.

"तुला वेगवेगळी छोटी जनावरं पहायची इच्छा होती," आजोबा म्हणाले, "चल, टरबुज खाऊ, चहा पिऊ आणि मी तुला काहीतरी दाखवतो. तू झोपला होतास तोवर मी टेहळणी करून शोध घेतलाय..."

"लौकर चला, नाहीतर ते पळून जाईल!" आरस्लान ओरडला.

"नाही पळणार. मला साळूचं जुनं घर सापडलंय."

साळूचं घर म्हणजे बीळ. पण हे बीळ साधं नसतं – तीन खोल्यांचं. पहिल्या खोलीत साळू-बाबा आणि साळू-आई राहतात. दुसऱ्या खोलीत साळूची मुलं राहतात आणि तिसरी खोली कोठीची.

बीळ उकरलेले होते आणि तीनही खोल्या स्पष्ट दिसत होत्या. कोठीच्या खोलीत अजूनही मुळ्यांचे आणि वनस्पतींच्या गाठींचे ढीग व्यवस्थित रचलेले होते.

"ती माणसांप्रमाणं राहतात!" आरस्लान चकित झाला.

"साळू कधीकाळी माणूस होता," आजोबा म्हणाले. "ती करुण कथा मेल्ली आजीनं तुला सांगितली नाही?"

"नाही."

"तर मग ऐक. पूर्वीच्या काळी एका माणसानं शेजाऱ्याकडून लोकरीच्या सुताच्या दोन गुंड्या उसन्या घेतल्या. जेव्हा कर्ज फेडण्याची वेळ आली, तेव्हा त्याला लोभ सुटला व मूळच्या गुंडीपेक्षा एक गुंडी त्यानं लहान दिली. ज्याला कर्ज परत केलं होतं त्या शेजाऱ्याच्या ध्यानात ही फसवणूक आली व तो चिडला. त्यानं त्या छोट्या गुंडीत चाती खुपसली आणि दोषी माणसाच्या अंगावर ती गुंडी फेकत तो म्हणाला: 'ही चाती तुझ्या शरीरात बाणासारखी खुपसो!'

"दोषी माणसाच्या अंगाला चातीचा नुसता स्पर्श झाला न झाला, तोच त्याच्या सर्वांगावर सुईसारखे बाण उठले. तशा रूपात लोकांमध्ये राहण्याचा त्या अप्रामाणिक शेजाऱ्याला धीर झाला नाही. तो लोकांच्या नजरांपासून दूर गेला आणि आजही स्वतः-च्या कृत्याबद्दल लाज वाटून जेव्हा लोक झोपतात, तेव्हा फक्त रात्रीच तो बिळाबाहेर पडतो."

"आजोबा, बघा! साळूची सुई!" आरस्लानला शोध लागला. "ती अगदी हुबेहूब चातीसारखी दिसते. मी घेऊ तिला?"

"घे," आजोबांनी परवानगी दिली, "आठवण म्हणून घे. जर तुला कधीकाळी लोभ सुटला, तर ह्या करुण कथेची नक्की आठवण कर."

## लढाई

रहिम-आगा, आरस्लान आणि बूबेन्चिक बेटाच्या खोल भागात जुन्या वाळुंजीकडे गेले. तेथेच मागील वसंतात महापुरापासून सशांची सुटका करण्यात आली होती.



एकदम रहिम-आगांनी आरस्लानचा हात धरून दबत्या आवाजात म्हटले :
"खाली पड !"

ते सावधपणे जमिनीवर झोपले. आजोबांनी दुर्बीणीमधून पाहिले व ती आरस्लान-ला दिली.

"तण माजलेल्या टेकाडावर रोख!" आजोबा पुटपुटले.

आरस्लान दुर्बीणीमधून रोखून बघू लागला आणि हळूच ओरडला :
"बॅजर !"

आणि पटकन त्याच्या ध्यानात आले की, बॅजर एकटा नव्हता. छोटचा, केसाळ बॅजरवर कोल्हा तुटून पडला होता.

कोल्हा बॅजरला चावा घ्यायचा प्रयत्न करीत होता, पण बॅजर चेंडूप्रमाणे दूर उडाला आणि कोल्ह्याच्या दातांपासून लांब गेला. पण नुसताच लांब गेला नाही, तर कोल्ह्यावर धावून गेला. तो मागच्या पायांवर उभा राहिला आणि पुढच्या लांब नख्यां-च्या पायांमध्ये कोल्ह्याचे मुस्कट त्याने पकडले.

"आजोबा, लौकर चला, बॅजरला वाचवू या!" आरस्लान म्हणाला.

"तो आपल्या मदतीविना निभावून नेईल," दुर्बीणीमधून लढाई बघत आजोबा म्हणाले. "गुबगुबीत बॅजरला गट्ट करायची कोल्ह्याला खूप इच्छा आहे, पण त्याच्या अंगी पुरेसं बळ नाही. पायांवर धड उभा राहू शकत नाही."

आणि खरोखरच कोल्हा एकदम कुशीवर खाली पडला. बॅजरने पुढच्या पंजांनी त्याला शेवटचा तडाखा हाणला व धूम ठोकली. कोल्हा आपल्या जखमा चाटत सरपटत तणात लपला.

"आज आपण किती गंमती बघितल्या," आरस्लान बूबेन्चिकला म्हणाला. "तू मोजतोस? मोज. आपण कोल्हा आणि बॅजर यांची लढाई बघितली. आपण साळूचं बीळ बघितलं. तीतर पाहिले आणि टरबुजं कशी पिकतात ते ऐकलं."

## चमत्कार

ते आणखी पुढे चालत गेले.

"तू गंमतींबद्दल बोलतोस," रहिम-आगा म्हणाले. "पण मी अस्सल चमत्कार पाहिलाय."

"कोणता?" आरस्लानचे डोळे चमकले.

"अलीकडंच घडलेली गोष्ट आहे, तुझा जन्म होण्यापूर्वी. स्वच्छ आकाशात काळा

ढग तरंगत आला, पाऊस पडू लागला, मग गारा पडू लागल्या आणि गारांबरोबर बेडक्या व मासे जमिनीवर कोसळू लागले."

"आकाशातून?" आरस्लानचा विश्वास बसेना.

"आकाशातून. प्रादेशिक केंद्रामधून आमच्या आऊलात एक व्याख्याता आला आणि असे पाऊस कसे पडतात ह्याचा त्यानं खुलासा केला. जोरदार वावटळ सरोवरावर उठते, स्वतःमध्ये पाणी आणि सरोवरातले प्राणी खेचून घेते, दूर प्रदेशात त्यांना घेऊन जाते आणि मग तिचा जोर कमी होतो व त्या सर्व प्राण्यांचा जमिनीवर पाऊस पडतो. आहे ना चमत्कार?"

"खरंच चमत्कार!" आरस्लान म्हणाला. "असा पाऊस बघायला हवा!"

"माझ्या वयापर्यंत जगलास म्हणजे सर्व काही बघशील," रहिम-आगांनी आश्वासन दिले.

## गरम वाळू

आजोबा व नातू उतार चढून गेले आणि मोठ्या झाडाखाली सावलीत बसले.

वरून अमूदार्या दिसत होती, बेटाभोवती वेढा घातलेल्या आर्नांची कोर दिसत होती. मेंढ्यांचे कळपही दिसत होते. आर्नांच्या तीरांवर बेट हिरवे होते, पण ते संपूर्ण ओआसिस नव्हते. उताराच्या दक्षिणेस पिवळी वाळू होती.

सूर्य डोक्यावर उभा होता आणि शरदाचा मोसम असूनही हवा गरम होती.

रहिम-आगांनी हुर्जूनमधून खाद्यपदार्थ बाहेर काढले.

आरस्लानने स्वतःच्या पावाचे दोन वाटे केले आणि अर्धा वाटा बूबेन्चिकला दिला.

"घराची आठवण येत नाही?" आजोबांनी विचारले.

"थोडीशी येते," आरस्लानने कबुली दिली.

"उद्या घरी परतू," रहिम-आगा म्हणाले. "उकाडा थोडा कमी झाला म्हणजे आपल्या मेंढ्या इथं कशा राहताहेत ते पाहतो. सकाळी गोड्या चिनी उसाच्या बिया गोळा करू, मोटारबोटीला हाक घालू आणि घरी जाऊ."

रहिम-आगा आणि आरस्लान जेवत होते तोवर बूबेन्चिक गवत चरत चरत उताराच्या पायथ्याशी गेले होते.

एकदम त्याने उडी मारली, ते बेंबाटले व माणसांकडे धूम धावत सुटले.

"कोल्हा?" आरस्लान घाबरला.

"ससा!" आजोबा हसले. "सशाला घाबरलं. बघितलास?"

ससा घाबरून वाळूवरून धावत उघडचा मैदानाकडे गेला.

"सशाच्या पिल्लाला पकडायची तुझी इच्छा आहे?" आजोबांनी विचारले.

"होय."

"तर मग धाव आणि त्याला पकड."

"सशाला मी गाठू शकेन?" आजोबांच्या विनोदामुळे आरस्लानला अपमान वाटला.

"गाठशील. हा ससा फार लहान आहे. भीतीमुळं तो वाळूवर धावला. पण वाळू आत्ता तापलेली आहे, त्याचे पंजे भाजणार. तो जास्त धावू शकणार नाही."

आरस्लान सशाचा पाठलाग करू लागला. त्याने सशाला धरले. सशाने त्याचा पाठलाग करणाऱ्याला पाहिले, त्याने काही उड्या मारल्या, पण वाळू खूप चटके देत होती. ससा जमिनीवर आडवा झाला व शरण आला.

आरस्लानने त्याला सदऱ्याखाली झाकून उतारापर्यंत आणले व सोडून दिले.

"त्याला स्वतंत्र जगू दे!" आरस्लान आजोबांना म्हणाला. "माझ्यापाशी बूबेन्चिक आहे."

"ससा स्वातंत्र्यात जास्त चांगला जगेल," आजोबा सहमत झाले. "खुशाल धावो!"

# धीट

रहिम-आगा आणि आरस्लान जोवर प्रवासात होते, त्या दरम्यान घरी मोठी साफसफाई चालली होती. ती अजूनही संपलेली दिसत नव्हती. अंगणात गालिचे आणि कांबळी टांगलेली होती. भिंतीपाशी मोठा आरसा टेकवून ठेवलेला होता.

"ब्यॅ-हॅं-हॅं!" बूबेन्चिक रागाने बेंबाटले. ते आरशापाशी आले व त्याने पाहिले... गळयात घंटी बांधलेले करडू!

एक करडू असले तर ठीक. पण दोन करडे म्हणजे मोठ्ठी मारामारी.

दुसऱ्याच क्षणी आरस्लानचा प्रेमळ मित्र आरशापासून मागे सरला, त्याने मुंडी खाली घातली आणि चारी पायांनी तो शत्रूवर धावून गेला. दुसरे करडूही प्रतिस्पर्ध्यावर धावून आले. थडाड! आणि आरशाच्या काचेचा चक्काचूर झाला.

"ब्यॅ-हॅं-हॅं!" बूबेन्चिक केविलवाणे बेंबाटले आणि त्याची घंटीही केविलवाणी किणकिणली.

आजीने झाडू उचलली, पण रहिम-आगांनी करडाला पाठीशी घातले.

"त्याला कशाबद्दल मारायचं? ते धीट करडू आहे! प्रतिस्पर्ध्यासमोर त्यानं माघार घेतली नाही."

आरस्लान स्वतःच्या मित्राला मिठी घालत म्हणाला:

"आजी! ते अजून लहान आहे! त्याला खूप काही समजत नाही."

मेन्ली-एजेने खूप खूप विचार केला व निर्णय घेतला:

"आरसा जुना होता, काळवंडला होता. म्हाताऱ्या, आपण नवा आरसा विकत घेतला पाहिजे. कदाचित त्याच्यात बघून आपण तरणे होऊ."

## परीकथा

हिवाळा आला. जमीन, आकाश आणि नदी यांचा रंग राखी बनला.

आरस्लानला उजाडण्यापूर्वीच जाग आली.

खूप दूर कुठेतरी, कदाचित पृथ्वीच्या एका टोकाला, वारा घोंघावत असल्याचे त्याला ऐकू येत होते.

"आजोबा, हा वारा आहे?" आरस्लानने विचारले. "बहुधा बर्फ पडणार. होय ना?"

"नाही, उंटाच्या पोरा, हा वारा नव्हे. हे लांडगे ओरडताहेत. आगीलमधल्या मेंढ्यांवर नजर टाकून येतो."

आजोबांनी कपडे घातले, भिंतीवरची बंदूक काढली.

"आणि माझ्या बूबेन्चिकलासुद्धा बघा!" आरस्लानने विनंती केली. अंधारात रस्त्यावर जायची त्याला भीती वाटत होती.

"झोप, उंटाच्या पोरा," रहिम-आगा म्हणाले, "सकाळ अजून खूप लांब आहे."

"हिवाळा नुकता सुरू झालाय, पण एव्हाना वसंत असावा असं खूप वाटतंय," डुलकी घेत आरस्लानने मनाशी विचार केला.

जेव्हा खूप काळपर्यंत बर्फ पडत नाही, तेव्हा हिवाळ्यात आनंद कमी असतो. पण हिवाळ्यातही चांगले दिवस असतात. जेव्हा मेन्ली आजी इतर बायकांबरोबर लहान मुलांच्या मदतीने लोकर निवडते आणि तिला कातायची तयारी करते, तेव्हा असे आनंदाचे दिवस असतात. तेव्हा परीकथांना अंत नसतो.

परीकथा ऐकायला आरस्लान स्वतःच्या बूबेन्चिकबरोबर येतो. करडू उंबरठ्यापाशी आडवे होते, स्वतःच्या पायांवर डोके टेकविते आणि उबेत डुलक्या काढते.

आजही रहिम-आगांच्या घरी माणसे जमली होती. मुले लोकर निवडताहेत, मेन्ली आजीने चाती सोडली, धागे धावू लागले आणि परीकथा सुरू झाली.

"माझ्या कोकरांनो, पूर्वीच्या काळी," आजी बोलू लागली, "आपल्या आऊलावर शत्रू सारखे हल्ले करत. लोकांचं आयुष्य वाईट होतं, पण आपल्यात असा एक कणखर जिगित वाढला, की ज्याला त्याच्या शूरपणाबद्दल लोकांनी बातीर असं नाव दिलं. शत्रू आपल्या आऊलापासून लांब राहू लागले, पण लोक फार दिवस शांततेत जगले नाहीत. स्तेपमधून दुष्ट वैरी आला. बातीरने तलवार उचलली, तो टेकडीवर गेला आणि नदीपलिकडे थेट क्षितिजापर्यंत सारे स्तेप शत्रूच्या घोडयांनी आच्छादून गेलेले त्याच्या दृष्टीस पडले.

"तेव्हा बातीर प्राचीन वाळुंजीपाशी गेला व त्याने विनंती केली: 'माझ्या लाडक्या वाळुंजी, मला लपव.' झाड बातीरसमोर उलगडलं आणि त्यानं बातीरला लपवलं. शत्रूंनी एव्हाना बातीरला टेकडीवर बघितलं होतं, त्यांच्या झुंडी त्याच्यावर धावून आल्या, पण त्यांना तो सापडला नाही.

"पण तेवढयात दुर्दैवानं तिथं एक नीलकंठ पक्षी उडत आला. त्यानं पाहिलं की झाडावरून अंगरख्याच्या लाल पट्टया लोंबत आहेत आणि त्या पट्टयांना तो खेचू लागला. पट्टया काही केल्या खाली पडेनात. नीलकंठ कर्कश्यपणं ओरडू लागला आणि शत्रूंनी-सुद्धा लाल पट्टया बघितल्या. त्यांच्या ध्यानात आलं की, बातीर त्यांच्यापासून झाडावर लपून बसला होता. शत्रू तलवारींसकट, कुऱ्हाडींसकट वाळुंजीवर तुटून पडले, पण कुऱ्हाडी आणि तलवारी फक्त बोथट बनल्या. त्यांच्या आघातांना वाळुंजीनं दाद दिली नाही. तेव्हा शत्रूंनी झाडाभोवती वाळक्या काटक्यांचा ढीग रचला, त्यांनी मोठी शेकोटी पेटवली आणि स्वत: हसत ते निघून गेले. बातीरला ठार मारलं अशी त्यांची समजूत झाली. तसंच घडलं असतं, पण तेवढयात तिथं एक पाकोळी आली. ती चोचीत पाणी भरून आगीवर ओतू लागली. शत्रूंनी पाकोळीलासुद्धा पाहिलं होतं, पण त्यांना वाटलं की, झाडावर तिचं घरटं होतं म्हणून ती आगीवरती भिरभिरते आहे. शत्रू दृष्टिआड झाले, पाकोळी चोचीमधून पाणी आणत राहिली आणि तिने आग विझवली. बातीर वाळुंजीमधून सहीसलामत बाहेर पडला.

"तेव्हापासून लोकांना नीलकंठ पक्षी आवडेनासा झाला. असं म्हणतात की, त्याच्या विश्वासघातकीपणाबद्दल त्याला दोनदा शिक्षा झाली. पहिली गोष्ट म्हणजे इतर पक्ष्यांपेक्षा कमी मुदतीत त्याची पिलं जन्माला येतात आणि थंडीमुळं ती पिलं अनेकदा मरतात; दुसरी गोष्ट नीलकंठ पक्षी चोचीमधून अंडी घालतो."

इथे मे[illegible]ी आजीने स्मित केले.

"अर्थात [illegible]ी काल्पनिक गोष्ट आहे. नीलकंठ चोर म्हणून प्रसिद्ध आहे. तो दुसऱ्यां-

च्या घरट्यांमधली अंडी पळवतो. लोकांनी हे बघितलं आणि परीकथेसाठी सोयीस्कर खुलासा त्यांनी बनवला."

"आणि पाकोळी?" आरस्लानने विचारले.

"पाकोळी तुर्कमेन लोकांची आवडती पक्षीण आहे. ती परत येते तेव्हा सर्वांना आनंद होतो आणि कुणीही, अगदी अत्यंत वांड मुलंसुद्धा पाकोळीचं घरटं मोडत नाहीत."

# आजोबांना नातवाची दया आली

"आरस्लान! तू झोपलास!" आजीने नातवाला जागे केले. "ऊठ, तुझ्या करडाला आगीलमध्ये घेऊन जा आणि मग झोप खुशाल!"

आरस्लानने ओव्हरकोट घातला, टोपी घातली व आनंदी घंटी लटकावली होती त्या फितीला पकडून करडाला आगीलमध्ये नेले.

रस्त्यावर अंधार होता, थंड वारा तोंडावर पावसाचे सपकारे मारीत होता, कॉलर भिजवत होता. थंडीमुळे व भीतीमुळे थरथर कापणाऱ्या आरस्लानने आगीलच्या रुंद लोखंडी फाटकाला धक्का मारला व करडाला ओरडून म्हटले:

"आत जा!"

आणि तो घरी पळाला.

आरस्लानच्या धक्क्यामुळे फाटकाला नुसता हिसका बसला होता, पण ते उघडले गेले नव्हते. करडाला आगीलच्या फाटकाबाहेर रात्र काढावी लागली आणि रात्री इथे लांडगे आले होते.

सकाळी म्हाताऱ्या रहिम-आगांनी ते भयंकर दृश्य बघितले आणि त्यांना रडू कोसळले. बूबेन्चिक आता जिवंत नाही हे नातवाला कसे सांगायचे? तेवढ्यात नातू आगीलपाशी धावत येऊन विचारू लागला:

"आजोबा, बूबेन्चिक कुठं आहे?"

"तुझं बूबेन्चिक खूप लांब गेले," उसासा टाकत रहिम-आगा उत्तरले. "काल रात्री तू आगीलच्या फाटकाला नुसता धक्का मारलास, उघडलं नाहीस. बूबेन्चिकला सबंध रात्र रस्त्यावर रहावं लागलं. भल्या पहाटे स्तेपमधून हरणं धावत आली होती. बूबेन्चिक त्यांना आवडलं, त्यांनी त्याला सोबत घेतलं, उघड्या स्तेपमध्ये नेलं."

डोळे विस्फारून आरस्लान आजोबांचे बोलणे ऐकत होता. त्याच्या गालांवरून आसवे ओघळत होती.

"आजोबा, ते परत केव्हा येईल?"

"जर तुझ्यावर विशेष रागावलं नसेल, तर येईल परत. केव्हातरी येईल परत," रहिम-आगा खोटे बोलले आणि चूल पेटवायला निघून गेले.

आरस्लान स्तेपकडे बघत उभा होता; जलद धावणाऱ्या हरणांच्या कळपाला आणि त्यांच्याबरोबरच्या राखी बूबेन्चिकला दूरवर ओझरते पाहण्याची आशा मनात बाळगत होता.





# ‘दोन पॉप्लरांची’ विहीर

आम्ही काराकूम वाळवंटाकडे चाललोय. कूली काकाने मला बरोबर घेतलेय. तो मेंढपाळ आहे.

पूर्वी मेंढपाळ मेंढ्यांच्या कळपांबरोबर अनेक महिनेपर्यंत जात असत. पण आता खूप मोटारीं आहेत. दर दोन आठवड्यांनी मेंढपाळ बदलतात. तर आता आम्ही पाळीवर चाललोय. आमचा प्रवास खूप लांबचा आहे, ‘दोन पॉप्लर’ नावाच्या विहीरीपाशी आम्हाला जायचे आहे. वाळवंटातील सर्व विहीरींना माणसांप्रमाणे नावे आहेत. ह्या विहीरीपाशी दोन पॉप्लर वाढत आहेत. सर्व वाळवंटात अवघी दोन पॉप्लरची झाडे. सगळ्या मेंढपाळांना ती माहीत आहेत. कोशावर — मेंढपाळ जेथे राहतात त्या छावणीला कोश म्हणतात — चारी-आगा आजोबा माझी वाट पहात आहेत. सारे आयुष्य मेंढ्यांच्या कळपांबरोबर ते वाळवंटात भटकत आहेत. वसंताच्या मोसमाच्या आरंभी ते ‘दोन पॉप्लरां’कडे जातात आणि हिवाळ्याच्या ऐन मध्यापर्यंत राहतात. तुर्कमेनीयात हिवाळा छोटा असतो.

शहाणा कुत्रा अकबाय आणि बायीर उंट हे आणखी दोघे कोशावर माझी वाट पाहताहेत. ते सगळे म्हातारे आहेत: चारी-आगा, अकबाय आणि बायीर.

# वाळवंटातील वसंत

काराकूम वाळवंटात फक्त वाळूच आहे असे तुम्हाला वाटते? निर्जन आणि रणरणती वाळू. पण नेहमी तसे नसते.

वसंतात प्रत्येक झुडूप बहरते. टेकाडावर अक्षरशः आग पेटलेली दिसते — ही पॉपीची

फुले आणि पुढे सर्व हिरवेगार. स्यूझेन, कान्दीम, बोर्झाक, ग्रेबेन्श्चिक, चेर्केझ, साक्साऊल, उंटकाटा, अशी झाडे-झुडुपे वाढतात. श्कीनची मुळे चहाबरोबर उकळतात. सेर्पोनोसिक लसणीसारखे असते.

बारखानाच्या माथ्यावर सेलीन आहे. लौकरच सर्व वनस्पती उन्हात जळून जातील, पण सेलीन हिरवेगार राहील. त्याच्या मुळांशी ओल टिकून राहते.

गरुड भराऱ्या मारतोय. मोठ्या शेतउंदराला किंवा सशाला शोधतोय.

वाळवंटातील छोटी गुबगुबीत जनावरे रस्त्यांवरून धावताहेत आणि बिळांमध्ये गायब होत आहेत.

विश्रांतीसाठी आम्ही एका ओसाड विहीरीपाशी थांबलो आणि आम्हाला नाग दिसला. तो फडा काढून उभा राहिला, पण आम्ही त्याला धक्का लावला नाही. आता सापांचे रक्षण करतात: औषधांसाठी विषाची गरज आहे.

शिवाय आम्ही हरणे पाहिली. काय वेगात धावत होती!

मग आमच्या 'गाझ' मोटारीवर राखी रंगाचा एक पक्षी खूप वेळपर्यंत उडत होता... मोठ्ठा, आकाशासारखा तेजस्वी पक्षी.

कोशावर आम्ही संध्याकाळी पोहोचलो. पांढरा प्रचंड सूर्य एव्हाना दूरच्या टेकाडांवर टेकला होता. मेंढपाळ नमदी गालिचांवर बसून चहा पीत होते, काऊर्मा – बकऱ्याचे भाजलेले मांस – खात होते. चारी-आगा गालिचावरून उठले, कूली काकाला भेटले आणि माझ्या खांद्यावर त्यांनी हात ठेवला.

मेंढ्यांचा कळप एकत्र उभा होता आणि माना ताणून नव्या माणसांकडे पहात होता. चारी-आगांच्या मदतनीसाने उंटावर सामान लादले. स्तेपमधल्या तळावर तो खाण्याचे पदार्थ, पाणी आणि गालिचा वाहून नेईल. तेथे मध्यरात्री मेंढ्या विश्रांतीला येतील. मेंढ्या रात्री चरतात. दिवसा फार उकाडा असतो.

कूली काकाने पटकन दुसरे बूट घातले. पायांना काटे बोचू नयेत, अंधारात चुकून सापावर अथवा विंचवावर पाय पडून अपाय होऊ नये म्हणून त्याने गुडघ्यांपर्यंतचे उंच बूट घातले.

"मुला, थोडी विश्रांती घे!" चारी-आगा कूली काकाला म्हणतात.

"मी वाटेत भरपूर विश्रांती घेतलीय. स्तेपवर जायला मी अधीर झालोय."

"मी स्तेपवर येऊ?" मी विचारतो.

"आपण उद्या जाऊ," चारी-आगा आश्वासन देतात. "आज चहा पिऊ, तारे बघू."

"गोष्ट सांगणार?"

"सांगेन."

# गोष्टी

सूर्य मावळला. वाळवंटावर अंधार पसरू लागला.

तंबूमागून माझा मित्र आला. बायीर. त्याने मला ओळखले. मी त्याची कूस आणि मान खाजवू लागलो. उंटाने सुस्कारा टाकला व तो गुडघे टेकवून बसला. चारी-आगाच्या गोष्टी ऐकायला तोसुद्धा आला.

चारी-आगा सावकाश बोलतात, जणू स्वतःचे शब्द स्वतःच ऐकतात. ते एक गोष्ट संपवतात आणि ताबडतोब दुसरी गोष्ट सुरू करतात.

म्हातारा कुत्रा अकबाय अंधारातून मुळीच आवाज न करता आला आणि चारी-आगापाशी निजून गोष्टी ऐकू लागला. ऐकता ऐकता डुलकी काढू लागला. फार म्हातारा झालाय.

"खूप खूप वर्षांपूर्वी एक श्रीमंत बाय रहात होता. त्याच्यापाशी मेंढ्या आणि घोडे एवढे होते की, त्यांची मोजणी करणं त्याला अशक्य झालं होतं. सर्वांना माहीत आहे: माणूस जेवढा जास्त श्रीमंत, तेवढा जास्त कंजूस. जनावरं हरवणाऱ्या मेंढपाळांना बाय कडक शिक्षा करायचा." चारी-आगाचा आवाज निर्झरासारखा मंजुळ भासतो. "गरीबाच्या पाठीशी संकट नेहमी हात धुवून मागं लागतं. एकदा घोड्यांची राखण करणारा मोतद्दार आऊलात गेला आणि घोड्यांचा कळप त्यानं स्वतःच्या मुलाच्या हवाली केला. अवघ्या एका दिवसाच्या अवधीत मुलानं स्तेपमध्ये दोन घोडे हरवले.

"बायपाशी तो धावला, त्याच्यासमोर गुडघे टेकवून बसला आणि म्हणाला:

"'इकी आत योक! दोन घोडे नाहीत!'

"'शोधून आण!' बाय ओरडला. 'नाही तर कामचा* बघशील! माझ्यापाशी कसा आहे ठाऊक आहे?'

"बायजवळचा कामचा लोखंडी आकड्यांनी विणलेला होता. तो कामचा नव्हता — लांडग्याचा उघडा जबडा होता.

"मुलगा स्तेपमध्ये धावला. त्यानं खूप वेळ शोध घेतला, पण घोडे सापडले नाहीत. एका उंच टेकाडावर चढून तो प्रार्थना करू लागला:

"'जर मला पंख असते, तर मी घोडे शोधून काढले असते आणि आई-बापापाशी, माझ्या आऊलापाशी परतलो असतो.'

"तो जणू योग्य वेळी बोलला — त्याला पंख फुटले. तो वाळूच्या टेकाडांवरून, पर्वतांवरून उडू लागला. त्याला बहिरीससाण्याचे पंख फुटले होते आणि दुसरे हिंस्र

---

* कामचा — कातडी वाद्यांचा चाबूक.

पक्षी त्याच्यापासून दूर राहू लागले. तरीही हरवलेले घोडे त्याला सापडले नाहीत.

"'इकी-आत-योक! इकी-आत-योक!' तो निराशेनं ओरडला.

"त्याला तेच नाव पडलं – इकात्योक. म्हणजे "कोकिळा."

"इकात्योक घरटं बांधत नाही, पिलं उबवत नाही: ह्यासाठी त्याला वेळ नाही, घोडे शोधले पाहिजेत. इकात्योक स्वतःची अंडी दुसऱ्यांच्या घरट्यांमध्ये टाकते आणि तिची पिलं पंख फुटल्यावर परक्या आई-बापांना सोडतात आणि हरवलेले घोडे शोधायला जातात. शोध शोध शोधतात, पण त्यांना घोडे सापडत नाहीत."

ज्या शेकोटीवर चहा बनवला होता, ती शेकोटी जवळजवळ विझली होती. अवघा एक निखारा एकदम लाल बनू लागला, पण ज्वाला पेटवण्याची ताकद त्याच्यात नाही आणि तो मिणमिणू लागला. क्षणानंतर पुन्हा फुलू लागला.

"पक्ष्यांबद्दलच्या आणखी गोष्टी तुम्हाला माहीत आहेत, चारी-आगा?"

चारी-आगा सफाईदार हालचालीने चहा प्याल्यात ओततात. मला स्वप्न पाहिल्याचा भास होतो.

"माझ्या उंटाच्या पोरा, प्रत्येक पक्ष्याबाबत, प्रत्येक जनावराबाबत लोकांपाशी गोष्टी असतात. सुतार पक्ष्याबाबत ऐक. हा तुरेदार रंगीबेरंगी पक्षी तुला माहीत आहे?"

"माहीत आहे."

"जे घडलं ते घडलं, जे नाही घडलं ते नाही घडलं," चारी-आगा नवी गोष्ट सुरू करतात. "एक बाई दोन मुलींना वाढवत होती. एक तिची स्वतःची मुलगी होती, दुसरी सावत्र मुलगी होती. पोटची मुलगी लाडात वाढत होती, सावत्र मुलीची सकाळ-पासून रात्रीपर्यंत कामाच्या रगाड्यात पाठ मोडत होती. सावत्र आईनं पोरीपाठी सतत ससे-मिरा लावला होता, बिचारीला केस विंचरायला सवड मिळत नव्हती.

"एकदा सावत्र आईनं दूध तापवायला सांगितलं. मुलीनं आग पेटवली, तिच्यावर भांडं ठेवलं, भांड्यात दूध ओतलं आणि स्वतः केस विंचरू लागली. तुर्कमेनी बायकांचे केस लांब असतात, वसंताच्या मोसमात बर्फ वितळणाऱ्या डोंगरी नदीप्रमाणं दाट असतात.

"मुलीनं केसात कंगवा घातला, पण तो हलेना. इकडे दूध पापाप्रमाणं वर वर उसळत आलं आणि उतू गेलं.

"सावत्र आई तंबूमधून धावत आली, सावत्र मुलीचा हात तिनं पकडला आणि स्तेपमध्ये तिला ढकलून देत ती म्हणाली:

"'चालती हो, नालायक कारटे, तुला पाहिजे तिकडं, पण माझ्यापाशी साय आणून दे. सायीविना परतू नको.'

"मुलगी रडत रडत धावली. खूप खूप धावली आणि मग उडू लागली. तिचे

हात पंख बनले, रंगीबेरंगी कपडे पिसं बनले. डोक्यावर कंगवा तसाच अडकून बसला होता. ती मुलगी सुतार पक्षी बनली. तेव्हापासून ती जगभर उडतेय आणि ओरडतेय:

"'हूप! हूप! दुधाच्या सायी, तू कुठं आहेस?'

"तीक्ष्ण नजरेच्या माणसांना दिसतं: सुतार पक्ष्याच्या डोक्यावर तुरा आहे. सुताराला केस विंचरायला कधी सवडच नाही."

## सकाळ

नंतर चारी-आगांनी मेर्गेनांबद्दलची गोष्ट सांगितली. आमच्याकडे शिकाऱ्यांना मेर्गेन म्हणतात. विधवेचा मुलगा महमूदची गोष्ट सांगितली. महमूद पाताळ राज्यात गेला, त्याने राक्षसाला ठार मारले, सुंदर पेरीची सुटका केली, मग सूमरूग पक्ष्याकडे तो उडत गेला... कुठे उडत गेला? एकदम मला दिसले की, पक्ष्याच्या पाचूच्या पिसांवर महमूद नव्हे तर मी निजलो होतो. मी उडत होतो! आणि भोवती उजाडत होते. मी डोळे उघडले आणि मला सूर्य दिसला.

मेंढ्या रात्रभर चरून पाणी प्यायला परतल्या होत्या.

मेंढीप्रमाणे बेअक्कल ही म्हण कुणाला सुचली? मेंढ्या हुशार असतात. कळपात त्यांची संख्या हजारपर्यंत असते, पण एका वेळी दोन-तीनशेपेक्षा जास्त मेंढ्या पाणी पिऊ शकत नाहीत. पहिल्या मेंढ्यांचे पाणी पिऊन होईपर्यंत बाकीचा कळप मुकाट वाट बघत उभा राहतो. ज्यांचे पाणी पिऊन झालेले असते त्या मेंढ्या बाजूला जाऊन उभ्या राहतात, वाट बघतात. पाणी प्यायला सगळ्या एकत्र आल्या, तशा विश्रांतीला एकत्र जातात.

अकबाय माझ्यापाशी धावत आला, माझ्या खांद्यावर त्याने पंजा ठेवला. ह्याचा अर्थ: चारी-आगा मला बोलावताहेत.

## गुंफा

कूली-आगा मेंढ्यांचा कळप घेऊन केव्हा येतो ह्याची वाट पहात मी आणि चारी-आगा बसून आहोत. कूली-आगाला यायला उशीर झालाय. अखेर दूरवर ते दिसू लागले. त्यांच्या चालीवरून चारी-आगांनी दुरूनच जाणले की, कूली काकाला रात्री काहीतरी अप्रिय प्रसंगाला तोंड द्यावे लागले होते.

आणि त्यांचा अंदाज बरोबर ठरला. लांडग्याने मेंढीची कुर्द्युक तोडली होती. कुर्द्युक म्हणजे जाडजूड शेपूट. तिच्यात चरबी साठवली जाते.

"गुंफेत नजर टाकली पाहिजे," चारी-आगा म्हणाले.

"गुंफा कुठं आहे?" मेंढपाळाला मी विचारू लागलो. "लांडग्यानं कुर्द्युक कशी तोडली? आता मेंढीचं काय होईल?"

"मेंढी जिवंत राहील," चारी-आगा म्हणाले. "गुंफा उद्या तू स्वतःच बघशील. आमच्या स्तेपमध्ये काय म्हणतात ठाऊक आहे: 'कानांनी दहा वेळा ऐकण्यापेक्षा डोळ्यांनी एक वेळ बघणं जास्त चांगलं!'"

दुसऱ्या दिवशी सकाळी आम्ही स्तेपमध्ये निघालो. खूप लांब चालावे लागेल असे मला वाटले होते, पण दोन किलोमीटरनंतर चारी-आगा दबत्या आवाजात म्हणाले: "मुला, जमिनीवर आडवा मुकाट पडून रहा." ते स्वतः माझ्याशेजारी निजले, दुर्बीण काढून किंचित पुढे सरपटत गेले, दुर्बीणीमधून न्याहाळत त्यांनी मला पुढे येण्याची खूण केली. "ते बघ, गुंफेतून बाहेर पडताहेत," माझ्या कानात ते पुटपुटले. दोन मोठे लांडगे आणि तीन लांडग्याची पिले मी पाहिली. मादी नराच्या खांद्यामागे चावली, पुढच्या पंजांनी तिने त्याला ओरबाडले, पण त्याने दातसुद्धा विचकले नाहीत. मी चारी-आगांकडे पाहिले. "आज त्याची शिकार चांगली झाली नाही. कमी अन्न आणलं. लांडगीण पिलांना सोडून जाऊ शकत नाही आणि चौघांना त्यानं एकटयानं खाऊ घातलं पाहिजे. मेंढीच्या कुर्द्युकवर कुणाची भूक भागणार!"

"तुम्ही पिलांची शिकार का करत नाही?" मी विचारले.

"लांडगेसुद्धा उपयुक्त प्राणी आहेत असं आता म्हणतात," चारी-आगा म्हणाले. "आणि ही पिलं आम्हाला धोकादायक नाहीत. लांडगे शेजाऱ्यांना सहसा धक्का लावत नाहीत. खूप काळ काहीच शिकार न मिळाल्यामुळं नर लांडग्यानं आमच्या कळपावर हल्ला चढवायचा निर्णय घेतला असावा. जरा थांब, पिलं मोठी होतील, तेव्हा आपण शिकार करू. पिलांना जिवंत पकडलं पाहिजे, त्यांना माणसाळवता येतं."

"लांडगे मेंढयांची राखण करणार!" मी विचार केला. "माझे आजोबा खूप हुषार आहेत! लांडगे उपाशी राहणार नाहीत आणि मेंढया सुरक्षित राहतील!"

•

## कलिंगडे

चारी-आगांनी कलिंगडांची लागवड केली होती.

वाळवंटात उगवलेली कलिंगडे सर्वांत जास्त गोड असतात.

"आता वाळवंट मेंढपाळांसाठी राबू दे!" चारी-आगा म्हणाले. उंटकाटयाच्या फांदीत त्यांनी कलिंगडाच्या बिया भरल्या आणि जुन्या टेकाडाच्या उतारावर कलिंगडांचा आणखी एक वाफा लावला.

सेलीन, कान्दीम, बोर्जाक ह्या वनस्पती जेथे उगवतात, तेथे कलिंगडे लावण्यात अर्थ नाही. जागा हिरवीगार, भरपूर सावली, पण ह्या वनस्पतीमध्ये कलिंगडे मरतात. वाळवंटातील वनस्पती साक्षात पंप असतात. सगळी ओल त्या शोषून घेतात.

"पहिली गोष्ट," चारी-आगा मला शिकवत होते," जागेची निवड. दुसरी गोष्ट – कासवं, शेतउंदीर आणि सूर्य ह्यांच्यापासून कलिंगडांच्या बियांचं रक्षण करणं. रोपांना जर नीट सावली दिली नाही, तर गरम वाळू रोपांची मुळं कात्रीनं कापल्या-प्रमाणं तोडून टाकते. कासवांना दूर राखण्यासाठी आपण फांद्यांचं कुंपण घालतो आणि शेतउंदरांना कोल्हे पळवून लावतील. कोल्हेसुद्धा कलिंगडं खातात, पण बिया नव्हे, तर पिकलेला गर. शेतउंदरांना बियांचा सुगावा लागतो आणि ते जमीन खणू लागतात. अगदी खोदयंत्रानं खणल्याप्रमाणं वाळू उडते! कोल्हा तिथं ताबडतोब हजर होतो! शेतउंदराची मानगूट पकडतो: 'मूर्खा, रोपं खराब करू नको! कलिंगड पिकलं म्हणजे मी गर खाईन, बिया तुझ्यासाठी ठेवीन. जर तुला स्वतःचा फायदा समजत नसेल, तर तुला मी खाऊन टाकीन.'"

चारी-आगा आज छान मनःस्थितीत आहेत. मी त्यांना विचारतो:

"आजोबा, मेंढया चारण्यासाठी तुम्ही मला केव्हा बरोबर नेणार?"

"आजच तयार हो. आज स्तेपमध्ये छान असेल. पौर्णिमा आहे."

संध्याकाळी म्हाताऱ्या चारी-आगांचे पाय दुखू लागले, मी कोमेजलो, पण चारी-आगांनी शब्द पाळला.

"कूली काकाबरोबर जा," ते मला म्हणाले, "त्याला मदत कर."

## कळपाबरोबर

कूली-आगाचे वडील मेंढपाळ होते, त्याचे आजोबा मेंढपाळ होते आणि पणजोबा-सुद्धा...

वाकडया काठीवर रेलून कूली-आगा वाळवंटाच्या मध्यभागी स्तब्ध उभा आहे; तो महाप्रचंड भासतो. त्याच्यासमोर टेकडयांवर संध्याकाळचा थकलेला सूर्य ओठंगला आहे.

मेंढयांमागून आम्ही हळू हळू चाललोय. आमच्याबरोबर साकार आणि बासार

हे कुत्रे आहेत. सूर्य जमिनीला टेकलाय, पण वाळू अजून भाजतेय.

कूली-आगा घंटीचा आवाज ऐकतोय. सेर्के* कळपाला वळवतोय. त्याला चांगल्या गवताचा सुगावा लागलाय. कळप त्याच्यामागे चरायला जातो. कूली-आगा किंचित कळपामागे गेला आणि पुन्हा थांबला. काठीवर रेलून सूर्यास्त बघू लागला. सूर्य मावळला. निरोपाच्या लाल किरणांनी त्याने आम्हाला मिचकावले आणि विश्रांतीसाठी तो बुडाला. सूर्य जेव्हा विश्रांती घेतो, तेव्हा आमच्या कामाला सुरुवात होते.

"उद्यापर्यंत!" कूली-आगा सूर्याला म्हणाला.

कूली काका अबोल आहे.

आत्तापर्यंत त्याच्या तोंडून हा अवघा एकच शब्द मी ऐकला. आम्ही एव्हाना दोन तास कळपामागून चालतोय. अंधार पसरला, भीती वाटू लागली, सळसळ आवाज दचकवू लागलेत. मी अवतीभोवती बघतोय. कदाचित लांडगे कळपामागून दबत दबत येत असतील.

टेकाडांवर चंद्र उगवला. कूली-आगाने स्वतःच्या गाढवाला पकडले व त्याच्या गळयात घंटी अडकविली. गाढवाच्या पाठीवर माणसांसाठी व कुत्र्यांसाठी खाण्याचे पदार्थ आणि पाणी लादले आहे. जर रात्री गाढव कळपापासून लांब कुठेतरी भरकटत गेले, तर भूक आणि तहान आम्हाला सोसावी लागेल.

अखेर वाळू थंड झाली. थंडीची नदी वाळवंटावर वाहू लागली. चांदण्यामध्ये वाळूच्या टेकड्या दुधाने न्हाल्याप्रमाणे भासतात. एवढा छान उजेड आहे की, पायांखाली वाळूचे कण हिमकणांप्रमाणे चमकत आहेत.

मेंढ्या डोकी वर न करता रवंथ करताहेत.

कूलीच्या पायांपाशी कुत्रे निजले. त्यांनी पंजांवर डोकी टेकविली. डोळे झोपलेत, पण जरा सळसळ आवाज झाला की वाऱ्याने पाने फडफडावीत तसे कुत्र्यांचे कान फडफडतात. आज कुत्रे शांत आहेत. रात्र फार उजेडी आहे. अशा रात्री कळपावर हल्ला करण्याचे धाडस लांडगे करणार नाहीत.

मध्यरात्री मेंढ्यांनी चरणे थांबविले, उघड्या जागी त्या एकत्र जमल्या आणि निजू लागल्या.

कूली-आगाने कळपामधून गाढवाला धरून आणले, त्याच्या पाठीवरून खाण्याच्या पदार्थांच्या पडशा व पाणी उतरवून घेतले. वाळक्या काटक्या मोडून त्याने शेकोटी पेटविली.

तांब्याच्या किटलीत त्याने पाणी तापत ठेवले. कुत्र्यांसाठी रबरी भांड्यात पाणी

---

* सेर्के – मेंढ्यांच्या कळपाचा म्होरक्या मेंढा.

ओतले. साकार उठला. बासार निजल्या निजल्याच पाणी प्यायला.

शेकोटी लहान आहे, पण तिच्यापासून छान ऊब मिळतेय.

किटलीत पाणी उकळतेय. कूली-आगा चहाबाबत काटकसर करीत नाही. चहा कडक आहे — माझी झोप तो उडवून लावतो.

शेकोटीपासून दहा पावले अंतरावर उंचवटयावर बसून आम्ही चहा पितोय. शेकोटी-पाशी खूप वेळपर्यंत बसून राहणे धोक्याचे असते. उजेडापाशी फालान्गा आणि काराकूर्त



यासारखे विषारी कोळी सरपटत येतात, विंचू येतात.

शेकोटीने शेवटची काटकी चाटली आणि ती शांत झाली. भोवतीसुद्धा सर्वत्र शांतता पसरली होती. चांदणेसुद्धा मंदावले. तारे जास्त तेजस्वी बनले. कुत्रे पहाऱ्याला गेले. कळप पेंगत होता.

कूली-आगाने डोक्याखाली स्वत:ची वाकडी काठी ठेवली — मेंढपाळाची कडक उशी — आणि परत तो आकाश न्याहाळू लागला. मीसुद्धा आकाश न्याहाळू लागलो. तो पहा मार्गदर्शक ध्रुव तारा. ती पहा मोठी अस्वली *. सारी रात्र चोरून सरपटतेय. ध्रुव

---

* सप्तर्षि.

ताऱ्याला गाठू पाहतेय. पहाटे मोठीं अस्वली पूर्वेकडे सरकते, ध्रुव ताऱ्याच्या पाठीशी उभी राहते आणि ह्या दरम्यान टेकड्यांवर आनंदी कृत्तिका उगवतात.

मेंढपाळांना आकाशाचे खगोलशास्त्रज्ञांएवढेच ज्ञान असते.

"मुला," एकदा चारी-आगा मला म्हणाले होते, "जर वाळवंटातून फिरणार असलास, तर स्वतःच्या तळहाताप्रमाणं वाळवंट माहीत असले पाहिजे आणि स्वतःच्या हाताच्या पाच बोटांप्रमाणं आकाश माहीत असले पाहिजे. ज्याला आकाश माहीत नाही, त्याला वाळवंट माहीत होणार नाही."

मेंढ्या जागच्या हलल्या व चालू लागल्या. मी व कूली काका उठलो आणि कळपा-मागून चालू लागलो.

मेंढ्या आता माघारी चालल्यात, विहीरीकडे, पाण्याकडे.

आकाश फटफटतेय, धुळीचा आणि गवताचा मधुर वास येतोय.

सकाळी शेकोटीपाशी चारी-आगा आम्हाला भेटतील आणि छान सुगंधी हिरवा चहा पाजतील.

"शुभ सकाळ, मेंढपाळा!" ते मला म्हणतील.

# उंट कशाला भितो

तारान्तुला चावला – खूप वेदना होतात; फालान्गा चावला – ह्यातही काही आनंद नाही; विंचवाने नांगी मारली – माणूस मरू शकतो. काराकूर्तला काराकूर्त हे नाव उगीच पडले नाही. काराकूर्त म्हणजे "काळा मृत्यू."

माणसाला ज्यापासून धोका आहे, त्यापासून उंटाला मुळीच भीती नसते. पण शेतउंदरांची वसाहत पाहताच उंट पटकन बाजूला होतो. आम्हा माणसांच्या दृष्टीने हे प्राणी निरुपद्रवी आहेत, पण उंटाला पाताळातील प्राण्यांशी भिऊन वागावे लागते. त्यांच्या प्रचंड घराला अडखळून उंटाचा पाय मोडणे सहज शक्य आहे.

# झेमझेम

झेमझेम, अथवा वारान, अथवा वाळवंटातील सुसर, भयानक जबडा विचकून दाखवतो, पण त्याच्या जवळ जाताच धूम ठोकतो. खूप उकाडा असतो तेव्हा सरडे कासवांच्या बिळांमध्ये घुसून बसतात आणि हवा थंड होण्याची वाट पाहतात.

दीड मीटरसुद्धा लांबीचे सरडे असतात. सरडा जेव्हा चिडतो, तेव्हा तो फुगू लागतो, घाबरवू पाहतो. असे म्हणतात की, अशा सरड्याविरुद्ध तलवारसुद्धा कुचकामी ठरते. सरडा उंदरांना खातो आणि पक्ष्यांची अंडी त्याला फार आवडतात.

## जिक-जिकी

जिक-जिकी आश्चर्यकारक पक्षी आहे. हा पक्षी फार मोठा नाही. तो घरटे झाडावर बांधत नाही, जमिनीवर बांधत नाही, तर खोल खड्ड्यांमध्ये, ओसाड विहीरींमध्ये बांधतो. असे म्हणतात की, त्याच्यावर आकाश कोसळेल अशी त्याला भीती वाटते. खोलगट जागेत, स्वतःच्या घरट्यात जिक-जिकी झोपतो, तेव्हासुद्धा त्याने पंजे वर उचललेले असतात. जणू आकाश कोसळलेच, तर पायांवर त्याला थोपवायचा त्याचा हेतू असतो.

## मैना

वाळवंटात राहणाऱ्या सर्वांबद्दल सांगणे अवघड आहे.

उदाहरणार्थ इथे वाळवंटी बोका राहतो. वाळवंटी उदमांजर राहते.

वाळवंटामधून अनेक पक्षी उडत जातात, पण काही कायम वस्ती करणारेही आहेत. नीलकंठ, वाळवंटी चिमणी, गरुड-घुबड, वाळवंटी कावळा... पण या प्रदेशात सर्वांत आवडता पक्षी म्हणजे भारतीय मैना.

ती पाकोळयांच्या कुटुंबातील आहे. आनंदी, मधुर गाणी गाते. मैनेला माणसाळवता येते.

असे सांगतात, चायखानावाल्या इब्राहिमकडे चायखान्यात एक मैना रहात होती. पाहुण्यांचे स्वागत करताना ती म्हणायची: "इब्राहिम, मेहमान आले." जेव्हा पाहुणा जायला निघायचा तेव्हा मैना मालकाला आठवण करून द्यायची: "इब्राहिम, पैसे घे."

•

## सापांसंबंधी

वाळवंटात साप खूप आहेत, पण सगळेच विषारी नाहीत. वाळवंटी अजगर आणि रुपेरी बाण साप निरुपद्रवी आहेत.

पण नागाला आणि दुसऱ्या विषारी सापांना मात्र टाळणे इष्ट. एवढे खरे, ह्या भयंकर विषारी सापांनाच साप पकडणारे लोक वाळवंटात शोधतात. ह्या विषारी सापांची फार गरज भासते. गेल्या काही वर्षांत साप कमी झाले अशी साप पकडणारे लोक तक्रार करतात. हे धोक्याचे चिन्ह आहे. सापाचे विष अनेक आजारांवर औषधी ठरते.



काराकूममध्ये खडखड्या साप राहतो. कधी कधी रात्री विचित्र आवाज ऐकू येतो. वाळवंटात पटकन सारे सावध होतात – खडखड्या साप शिकारीला निघाला.

## गोल डोक्याचा सरडा

तुर्कमेनीयात त्याला सारीकेलनेझे म्हणतात – पिवळा निंदक. त्याची कातडी वाळूच्या आणि साक्साऊलच्या फांद्यांच्या रंगाची असते – पिवळट तपकिरी. त्याला निंदक म्हणण्याचे कारण सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत तो साक्साऊलच्या राईत बसून राहतो आणि सूर्याला शिव्याशाप मोजतो.

सारीकेलनेझे सूर्याला मौनात शिव्या घालतो आणि वाळूत तो छान लपला जातो, पण त्याच्या रागीटपणापायी तो उघडा पडतो. त्याच्या गळयावरची पिशवी थरथरते आणि पाणी उकळल्याप्रमाणे तिच्यातून आवाज निघतो.

टेकाडांपलिकडे सूर्य जेव्हा खाली जाऊ लागतो, तेव्हा सारीकेलनेझे आनंदी बनतो. त्याच्या शिव्याशापांपायी सूर्य नष्ट झाला, असे त्याला वाटते.

सकाळी तेजस्वी सूर्य आकाशात वर चढतो आणि सारीकेलनेझे परत सूर्याला शाप देऊ लागतो. त्याच्या संतापापायी त्याच्या शत्रूंच्या तावडीत तो सापडतो, पण त्याला राग आवरत नाही.

सूर्य मावळतीला जातो आणि सारीकेलनेझेला वाटते की, हा शेवटचा सूर्यास्त. पण सूर्य उद्याही उगवेल.

## सूर्यास्त

काळाने जुनाट बनलेल्या व वारंवार वाजविल्यामुळे पिवळट पडलेल्या खंजिरीप्रमाणे दिसणारी सूर्याची प्रचंड थाळी अथांग, वाळवंटी महासागरात खाली खाली जात असते. सबंध दिवस सूर्य निष्ठुरपणे भाजून काढत होता, आकाशाला राखट-पांढऱ्या धुक्यात गरफटवून टाकत होता. पण ऐन सूर्यास्तापूर्वी निसर्गात एकदम बदल घडले: आकाश फिकट निळे बनले, तापलेले वातावरण थंड बनले.

वाळूचे कण चमकतात. दिवसभर जणू ज्वालामुखींप्रमाणे धुमसणाऱ्या वाळूच्या टेकड्या सूर्यास्तापूर्वीच्या काही मिनिटांमध्ये स्तब्ध बनतात. रात्री काराकूमवर पुन्हा

वारे वाहतील, वाळूच्या टेकड्या परत धुमसू लागतील, साक्साऊलच्या फांद्या आणि वाळक्या गवताचे देठ सळसळत एकमेकांशी कुजबुजू लागतील.

पण हे रात्री घडेल, जेव्हा द्राक्षांप्रमाणे टप्पोरे दिसणारे दक्षिणेच्या आकाशातील तारे काराकूमवर ओठंगतील, पण आत्ता...

शांतता आणि नीरवता. निसर्गातील सर्व गोष्टी स्तब्ध बनल्याप्रमाणे भासते. श्वास रोखून आम्ही सूर्यास्त पाहतोय.

दूरच्या टेकडीच्या माथ्याला सूर्य टेकला, काराकूमला त्याने शेवटच्या रक्तरंगी नजरेने पाहिले आणि वाळूच्या लाटांमध्ये तो बुडाला. काही मिनिटांनंतर रात्र पडेल. दक्षिणेत संध्याछाया नाहीत. सूर्य मावळला – रात्र, सूर्य उगवला – दिवस.





# शीर्दाक आणि यार्तीगूलोक

जर चलाख तू लबाडीत
चोराला लपवण्यात पटाईत,
तर यार्तीगूलोकची वाट पहा
लौकरच येईल तो पाहुणा.

यार्तीगूलोकबद्दलचे हे गाणे खुद्द यार्तीगूलोक गात होता. तो खूप आनंदात होता. म्हणजे कुणा वाईट माणसाला त्याने धडा शिकविला होता.

यार्तीगूलोक खेड्यातील रस्त्यावरून चालला होता आणि त्याचे गाणे चंडोलाच्या लकेऱ्यांप्रमाणे भासत होते.

एकदम तो गप्प झाला. रस्त्याच्या कडेशी एका उंचवटयावर त्याच्यापेक्षा अर्धी टोपी कमी उंचीचा एक माणूस उभा होता.

"सलाम!" छोटया माणसाला पाहून खूप चकित झालेला यार्तीगूलोक म्हणाला.

"सलाम!"

"ए मित्रा! मी यार्तीगूलोक, तू कोण?"

"माझं नाव शीर्दाक," छोटा माणूस उत्तरला.

"म्हणजे तू कापडी माथ्याची टोपी?"

"होय."

"कुठं चाललास?"

“बोकड विकायला निघालोय.”

“बोकड कुठं आहे?”

“एका माणसानं मला गाठून विचारलं: ‘तू बोकडाच्या मोबदल्यात करडू घेशील का? त्याला हाकत नेणं तुला सोपं जाईल.’ मी उत्तरलो: ‘होय, घेतो.’”

“करडू देऊन तू कोंबडा घेतलास, कोंबडा देऊन अंडं घेतलंस, अंडं देऊन सुई घेतलीस... मला ही गोष्ट माहीत आहे.”



“मी कोंबडयाच्या बदल्यात अंडं घेतलं नाही!” शीर्दाक रागावून म्हणाला. “मी त्याच्या मोबदल्यात सशाचं पिलू घेतलं आणि सशाच्या पिलाच्या बदली ही सुरेख टोपी घेतली, जिला सगळेजण ‘शीर्दाक’ म्हणतात.”

“म्हणजे बोकड बदलून तू फक्त टोपी घेतली नाहीस, तर स्वतःचं नावसुद्धा बदलून टाकलंस?”

“खरं आहे तुझं म्हणणं यार्तीगूलोक. गीर्देनेकपेक्षा शीर्दाक नाव जास्त चांगलं आहे.”

इथे दोन छोटया माणसांच्या संभाषणात अनुवादकाने खंड पाडला पाहिजे आणि वाचकांना खुलासा केला पाहिजे की, गीर्देनेक ह्याचा तुर्कमेनी भाषेत अर्थ होतो “बुटका.”

"शीर्दाक, तुला असं तर वाटत नाही, की नाव बदलल्यामुळं तुझी उंची वाढली?" यार्तीगूलोकने विचारले.

"तेच तर म्हणतोय, माझी उंची वाढल्याचा मला भास होतोय!" शीर्दाकने कबुली दिली. "चल, मोजू या."

त्यांनी एकमेकांच्या पाठीला पाठ लावली आणि शीर्दाकला तो यार्तीगूलोकपेक्षा बुटका असल्याचे जाणवले तेव्हा तो अंगठ्यांवर उभा राहिला आणि यार्तीगूलोकच्या उंचीएवढा बनला.

"बघितलंस!"

"मी सगळं बघतोय!" यार्तीगूलोक उत्तरला.

ते हसले आणि विश्रांतीसाठी बसले.

"यार्तीगूलोक, मी ऐकलंय, तुला प्रवासाची फार आवड आहे," शीर्दाक बोलू लागला, "तर मला सांग, तुझ्या-माझ्यासारख्या बुटक्या माणसांना खेळण्यांबरोबर खेळता येईल अशी जागा कुठं आहे? कारण सगळी खेळणी आकारानं खूप मोठी आहेत. सीट-वरून पायडलपर्यंत माझे पाय पोचतील अशी सायकल घ्यायची माझी फार इच्छा आहे."

"त्यापेक्षा मोटारीतून जाणं जास्त चांगलं. आणि त्यापेक्षाही विमानातून जाणं उत्तम. खूप वेगानं," यार्तीगूलोक म्हणाला.

"पण सायकलवरून गेलं तर कुणाला त्रास द्यावा लागत नाही," शीर्दाकने प्रत्युत्तर केले.

## शीर्दाक आणि दुर्दीली

छोटा मुलगा रडत होता. मोठ्या वयाच्या पोरांनी त्याचे धनुष्य मोडले होते.

"बातीर* बनला होतास आणि रडतोस एखाद्या मुलीसारखा!" शीर्दाक चिडून म्हणाला.

लहान मुलाने हाताने आसवे पुसली व तो इकडेतिकडे बघू लागला.

"मी इथं आहे," अंगठ्यांवर उभे रहात शीर्दाक म्हणाला.

"ओहो! किती आश्चर्यकारक गोष्ट! जणू खराखुरा माणूस! टोपी किती मजे-दार!" मुलगा आनंदला. धनुष्य मोडल्याचे दुःख तो विसरला.

"मी गोष्ट नव्हे. माझं नाव शीर्दाक."

---

* बातीर – बाहुबली.

"शीर्दाक?"

"होय, शीर्दाक. तुझं नाव काय?"

"माझं नाव दुर्दीली!" मुलाचे डोळे चमकत होते. काय मजेदार खेळणी असतात: बोलतात, हलतात, वाद घालतात! "मी तुला हातात घेऊ?"

"घे!" शीर्दाकने परवानगी दिली आणि मुलाने पुढे केलेल्या तळव्यावर तो चढला.

दुर्दीलीने छोटया माणसाला डोळ्यांजवळ नेले, नीट न्याहाळले. शीर्दाक गाणे म्हणत उडया मारत होता:

एक होता शीर्दाक.<br>
एक होता दुर्दाक.<br>
दोघांची खूप छान<br>
गट्टी जमली होती.

"खरंच आपण मैत्री करू!" दुर्दीली म्हणाला व थोडा विचार करून पुढे म्हणाला: "अर्थात तू खरा असलास तर!"

"अर्थात मी खरा आहे!" शीर्दाक उडी मारून एका पांयावर उभा राहिला, मग दुसऱ्या पायावर.

"पडशील!" दुर्दीली घाबरला.

"मला काहीही होणार नाही!" शीर्दाक जोरात बढाई मारत म्हणाला. "यापूर्वी मी झाडावरून पडलोय, गाढवावरून पडलोय!"

दुर्दीलीने शीर्दाकला जमिनीवर ठेवले आणि एकदम तो खिन्न बनला.

"ओठांना मुरड का घातलीस?" शीर्दाकला आश्चर्य वाटले.

"आपण खरंच मित्र आहोत?" दुर्दीलीने विचारले.

"अर्थात, खरं!"

"म्हणजे तू आमच्या घरी येशील?"

"घरी काय करायचं?"

"खेळायचं. तुझी इच्छा असेल तर मी तुला गोष्टींचं पुस्तक वाचून दाखवीन. मला वाचता येतं."

"ठीक आहे," शीर्दाक कबूल झाला, "जर पुस्तक मजेदार असेल, तर चल वाचायला."

ते परीकथांचे पुस्तक होते. त्यांनी अंदाजाने मधलेच पान उघडले आणि दुर्दीलीने गाढवाचे कान असलेल्या राजाची गोष्ट वाचली. राजाचे केस कापणाऱ्या व त्याची

दाढी घोटणाऱ्या न्हाव्याला हे भयंकर रहस्य ठाऊक होते. त्याला ह्याचा फार त्रास होऊ लागला. दुसऱ्या कुणाला हे गुपित तो सांगू शकत नव्हता. गुपित फोडणाऱ्याला राजाने मुंडके उडवायची धमकी घातली होती. तेव्हा बिचाऱ्या न्हाव्याने हे गुपित रिकाम्या विहीरीत ओरडून सांगितले. काही काळ लोटला. विहीरीपाशी बांबूचे झाड वाढले. एका गुराख्याने तो बांबू तासून बासरी बनविली. त्या बासरीने प्रथम त्याला आणि नंतर सर्व जगाला राजाच्या गाढवाच्या कानांचे गुपित सांगितले.

"बोधक गोष्ट आहे," शीर्दाक म्हणाला. "दुर्दीली, तू गुपित राखू शकतोस?"

"अर्थात!"

"हे फार छान. लक्षात ठेव दुर्दीली : जर आपल्या मैत्रीबद्दल तू कुणाला सांगितलंस, तर मी नाहीसा होईन."

"कसा नाहीसा होशील?"

"हा असा!"

आणि छोटा माणूस नाहीसा झाला.

"शीर्दाक! शीर्दाक!" दुर्दीली जोरजोराने ओरडला.

"हा मी इथं आहे! ओरडू नको!" शीर्दाक पूर्वीच्याच जागी कानांवर हात ठेवून उभा होता.

"तू नाहीसा होऊ नको बाबा!" दुर्दीलीने त्याची विनवणी केली. "मी तोंडाला कुलूप लावीन. कार्लसोनबद्दलचं माझं सर्वांत आवडतं पुस्तक मी तुला वाचून दाखवू? त्याच्यात शेवटचं पान नाही, तरीही मी ते वाचतो."

"कुठं गेलं शेवटचं पान?"

"छोट्या भावानं फाडलं. तो अजून खूप लहान आहे. पण शेवटचं पान नसलं तरी हे पुस्तक खूप मजेदार आहे."

"त्या गोष्टीचा शेवट तुला जाणून घ्यायची इच्छा आहे?"

"अर्थात!"

"तर मग तात्पुरता आपण निरोप घेऊ," शीर्दाक म्हणाला. "कदाचित मी नवीन पुस्तक पैदा करीन."

•

## दिलेला शब्द पाळ!

शीर्दाक नाहीसा झाला आणि त्याच क्षणी दुर्दीली घरातून धूम पळाला. त्याच्या बाबतीत एक अस्सल चमत्कार घडला होता! तो, दुर्दीली, एका जादूच्या छोट्या

माणसाचा मित्र बनला होता. शीर्दाकबद्दल त्याने इतर मुलांना सांगितले असते, तर मुलांचा त्याच्यावर विश्वास बसला नसता. दुर्दीली सायकलवर बसला व त्याचे वडील जेथे काम करीत होते त्या घोडशाळेकडे गेला. दुर्दीलीची त्याच्या वडिलांशी घट्ट मैत्री होती.

"पपा!" दुर्दीली दुरूनच ओरडला. "पपा, मला नवा मित्र सापडलाय. तो आपल्या घरात राहणार आहे."

"हा कोण बुवा तुझा नवा मित्र?" मुळीच चकित न होता वडिलांनी विचारले.

"हा छोटुकला माणूस आहे. तुम्हाला कसं समजावून सांगावं ते मला समजत नाही. तुम्हाला आठवतं, शेवटचं पान नसलेलं एक पुस्तक आपल्याकडं आहे... त्या पुस्तकात मालीश नावाच्या मुलाला छपरावर राहणारा कार्लसोन नावाचा मित्र असतो. तो पंख्याच्या मदतीनं मुलाकडं उडत येतो..."

"तुलासुद्धा असा कार्लसोन भेटलाय काय?" वडिलांनी विचारले.

"कार्लसोन नव्हे, शीर्दाक. खूप खूप लहान आहे. त्याला तळहातावर घेता येतं. चला, मी तुम्हाला तो दाखवतो. खरं तर आमच्या मैत्रीबद्दल कुणालाही सांगायचं नाही अशी त्यानं माझ्याकडून शपथ घेतलीय, पण मी तुमच्याशिवाय दुसऱ्या कुणालाही सांगितलं नाही... चला! लौकर!"

"ठीक आहे! चला!" वडील कबूल झाले.

दुर्दीलीची सायकल त्यांनी फटफटीच्या जोडगाडीत ठेवली व ते फटफटीवरून घरी निघाले.

"शीर्दाक!" दुर्दीली स्वतःच्या खोलीत धावत जात ओरडला. "कुठं आहेस तू?"

छोटा माणूस खोलीत नव्हता.

"कदाचित अजून तो परतला नसेल? तो पुस्तक आणायला गेला होता."

"दुर्दीली, तू मजेदार गोष्टी मनाशी रचतोस," वडिलांनी कपाळाला आठ्या घातल्या. "पण लोकांच्या कामात तू अडथळा कशाला आणतोस? आज मी तुझ्यावर विश्वास ठेवला, पण पुढच्या वेळी, जरी हत्ती घरी आणलास, तरी बघायला येणार नाही."

"पपा, पण तो इथं होता!" दुर्दीली उद्गारला आणि टेबलावर त्याला पुस्तक दिसले. "बघा, पपा!"

हे मालीश आणि कार्लसोनबद्दलचे अगदी नवे कोरे पुस्तक होते. त्यात शेवटचे पानही होते.

"तो आला होता!" दुर्दीलीने टाळ्या वाजवल्या. "त्यानं स्वतःचा शब्द पाळला!"

वडील ते पुस्तक चाळू लागले.

"आश्चर्य आहे! तुझ्या मित्राचं नाव काय?"

"शीर्दाक!"

दुर्दीली डोके खाली घालून उभा राहिला आणि त्याच्या गालांवरून टपोरी आसवे ओघळू लागली.

"काय झालं?" वडील अस्वस्थ झाले.

"शीर्दाकनं शब्द पाळला, पण मी पाळला नाही. गुपित राखलं नाही. आता शीर्दाक पुन्हा कधीही माझ्याकडं परतणार नाही."

"आता काही उपाय नाही," वडिलांनी दुर्दीलीला मिठी घातली. "दिलास शब्द तर पाळ. पुरुषाचा शब्द भक्कम असला पाहिजे."

दुर्दीलीने पुस्तक छातीशी घट्ट आवळले व नुसते डोके हलविले, आणखी एक शब्द उच्चारायला तो भीत होता. त्याला अश्रू आवरायचे होते; जर बोलला असता तर डोळ्यांमधून आसवांचा पूर लोटला असता.

# चुकीची योजना

शीर्दाक यार्तीगूलोकला भेटायला आला होता. जुन्या तुतीच्या झाडापाशी छोटुकले घर उभे होते. दार बंद होते व त्यावर आडवी काठी होती: ह्याचा अर्थ मालक घरात नव्हता.

शीर्दाक निघून जायच्या बेतात होता, पण एकदम त्याच्या ध्यानात आले: जमिनीवर बाण आखला होता. आणखी काही पावलांनंतर त्याला आणखी एक बाण आढळला. यार्तीगूलोक कुठे होता ती जागा त्याने दाखविल्याचे दिसत होते.

एका बाणापासून दुसऱ्या बाणापर्यंत जात जात शीर्दाक एका उंच कुंपणापाशी पोहोचला. आमान-आगाच्या बागेचे ते कुंपण होते. एका फळीवर बाण कोरला होता. शीर्दाकने ती फळी रेटली आणि ती बाजूला सरकली.

बाग खूप मोठी होती. जर्दाळूचे झाड पिकलेल्या फळांच्या भाराने वाकले होते.

धप्प! शीर्दाकच्या पायांपाशी सफरचंदाच्या आकाराचा जर्दाळू आपटला.

शीर्दाकने डोके वर करून पाहिले. अर्थात यार्तीगूलोकचा तो वात्रटपणा होता.

"दुसऱ्याच्या बागेत झाडावर तू काय करतो आहेस?" शीर्दाकने आश्चर्याने विचारले.

"तुझी वाट पाहतोय."

“ माझी ?! ”

“ शीर्दाक, तू छोट्या मुलांचा सर्वांत छान मित्र आहेस. त्यांना इकडं बोलाव. ह्या सुरेख फळांची झाडं मी गदगदा हलवतो. खुशाल पोरांना मेजवानी मिळो.”

“ पण यार्तीगूलोक, तुला माहीत नाही, आमान-आगा अत्यंत लोभी माणूस आहे. असं म्हणतात, हिवाळ्यातसुद्धा तो बादलीभर बर्फ देत नाही.”

“ म्हणून आपण त्याला धडा शिकवू. कुत्र्यांना मी झोपवलंय आणि खुद्द आमान-आगा आज शहरात गेलाय. तुझ्या आनंदी फौजेला लौकर बोलाव.”

शीर्दाकने डोके नकारार्थी हलविले.

“ माझे मित्र दुसऱ्यांच्या वस्तू घेत नाहीत.”

“ अरे जरा बघ! फळांच्या भारानं झाडं वाकलीत. आमान-आगाला असं भरघोस पीक गोळा करणं जमणार नाही. अर्धे जर्दाळू झाडांवरच सडून जातील.”

“ नाही, यार्तीगूलोक! तुझी योजना चुकीची आहे. त्यापेक्षा खुद्द आमान-आगा मुलांना बोलवील, अशी युक्ती काढ.”

“ ठीक आहे! काहीतरी विचार करीन.” यार्तीगूलोक झाडावरून खाली उतरला. “ चल माझ्या घरी.”

“ मी आनंदानं आलो असतो, पण माझ्या काळजात जाणवतंय – छोटी मेन्ली मोठ्या संकटात आहे. तिच्या मदतीला धावतो.”

शीर्दाकने टोपी कपाळावर खेचली व शीळ घातली. त्याच क्षणी कासव-कबूतर जमिनीवर उतरले. शीर्दाक त्याच्या पाठीवर बसून उडाला.

## मेन्ली आणि कोंबडीचे पिलू यांच्याविषयी

भटक्या कुत्र्याने कोंबडीचे पिलू पकडले. पिलाची आई कुत्र्यावर तुटून पडली आणि कोंबडीच्या मदतीला मेन्ली घरातून धावत आली. कुत्र्याने पिलू टाकले व धूम ठोकली.

एक पंख पसरून पिलू धुळीत तळमळत पडले.

मेन्ली जोरात रडू लागली: बिचाऱ्या पिलाला कसे वाचवायचे हे तिला माहीत नव्हते.

“ आसवं मदत करणार नाहीत,” एक बारीक आवाज बोलला. “ औषध आणि सेवा मदत करतील.”

मुलीने सभोवार पाहिले – कुणीही नाही.

"मी तुझ्याशी बोलतोय. सांभाळ, माझ्यावर पाय देऊ नको!"

मेन्लीने पायांखाली पाहिले तेव्हा मजेदार टोपी घातलेला एक छोटा माणूस तिला दिसला.

"शीर्दाक – तू?"

"होय, मी शीर्दाक."

"तू माझ्या मदतीला आलास?"



"कामाला लाग, मेन्ली! एखादी जुनी टोपी किंवा जुन्या कांबळ्याचा एखादा तुकडा आण आणि कोंबडीच्या पिलासाठी घरटं बनव."

"बुजगावण्यावरची टोपी चालेल?"

"तीच पाहिजे, पण प्रथम पिलाला काहीतरी पाजलं पाहिजे. बारीक कापलेलं अंडं आणि कोंडा त्याला खाऊ घातला पाहिजे."

मेन्ली जोवर जखमी पिलाला पाणी पाजत होती, घरटे बनवत होती व खाणे तयार करत होती, तोवर शीर्दाकने उपचारांची सर्व सामग्री आणली: बांबू, शिलाजित आणि माशाची चरबी. पिलाच्या मोडलेल्या पायाला त्यांनी बांबू बांधला, शिलाजित पाण्यात मिसळून पिलाला पाजले आणि जखमी पंखाला माशाची चरबी माखली.

दररोज सकाळी शीर्दाक मेन्गलीच्या घरासमोरच्या अंगणात यायचा. चौथ्या दिवशी तो म्हणाला :

"आता तू स्वतः उपचार करायला शीक! पिलू लौकरच बरं होईल. अच्छा, मेन्नली."

"शीर्दाक, मी तुझी आभारी आहे! माझी आठवण म्हणून हे घे."

आणि तिने छोटचा माणसाला रेशमाच्या धाग्यांनी स्वतः विणलेला छोटा शेला भेट दिला.

शीर्दाकने अंगरख्यावर शेला बांधला व प्याल्यातील पाण्यात प्रतिबिंब पाहिले. तो स्वतःवर खूप खूष झाला. तेवढचात अंगणात कासव-कबूतर उडत आले. शीर्दाक त्याच्या पाठीवर बसून उडत गेला.

खूप दिवसपर्यंत प्रत्येक कासव-कबूतराला मेन्नली टक लावून पहायची : छोटा माणूस दिसेल अशी तिला आशा वाटायची.

पिलू खरेच बरे झाले, मोठे झाले आणि रंगीबेरंगी कोंबडीत त्याचे रुपांतर झाले.

मेन्नलीसुद्धा मोठी झाली व शाळेत जाऊ लागली. रंगीबेरंगी कोंबडी दररोज मेन्नली-ला घराच्या उंबरठचापासून कुंपणाच्या फाटकापर्यंत सोडायला जायची आणि मेन्नली शाळेतून परतली म्हणजे फाटकाशी तिला भेटायची व घराच्या उंबरठचापर्यंत सोबत करायची.

# कडू औषध

देन्लीला थंडी बाधली आणि तो आजारी पडला. त्याला विचित्र स्वप्ने पडायची. समर्कंदमधून तो पांढऱ्या अरबी घोडचावर बसून चाललाय, उलूगबेक टेकडीवर दौडत जातो, दुर्बीणीमधून चंद्र पाहतो आणि चंद्रावर त्याचे वडील ट्रॅक्टरने नांगरणी करताहेत, असे स्वप्न त्याने पाहिले. मग तूला शहर स्वप्नात दिसू लागले. प्रत्यक्ष शहर नव्हे, तर शस्त्रास्त्रांचे वस्तुसंग्रहालय. वस्तुसंग्रहालयातून फिरताना तो पाटी वाचतो : "वस्तूंना हात लावू नका." पण तो हळूच बंदुकीचा चाप ओढतो. मोठा बार वाजतो... इथे स्वप्न तुटले. मोठचांदा किंचाळत देन्ली बिछान्यात उठून बसला. त्याची आई धावत आली आणि मुलाने औषध प्यावे म्हणून त्याची मनधरणी करू लागली.

"ते कडू आहे!" देन्लीने औषध व पाण्याचा ग्लास दूर सारले आणि झोपल्याचे सोंग केले. त्याला खरेच झोप लागली. पुन्हा त्याला तेच स्वप्न पडले.

देन्लीला ह्याचे आश्चर्य वाटले नाही. काही दिवसांपूर्वीच त्याला बिल्ले भेट

मिळाले होते : 'समर्कंद' आणि 'तूलामधील शस्त्रास्त्र वस्तुसंग्रहालय.' पण समर्कंदला आणि स्वत:ला पांढऱ्या घोड्यावर बसलेला पाहण्याऐवजी अचानक विचित्र टोपीतील छोटा माणूस त्याने बघितला, तेव्हा तो घाबरला.

"तू आईला का छळतोस?" तो माणूस ओरडला. "जर थंडी बाधून घेतलीस, तर आता पी औषध!"

"तू कोण?" देन्लीने सावधपणे विचारले.

"तुला खरंच माहीत नाही?"

"बहुतेक, तू शीर्दाक. पण शीर्दाक प्रेमळ आहे, पण तू ओरडतोस."

"मी प्रेमळसुद्धा आहे. तू लौकर बरा व्हावास अशी माझी इच्छा आहे. आईला हाक मार आणि औषध पी. अशा शौर्याबद्दल मी तुला कोणतीही भेटवस्तू देण्याचं आश्वासन देत नाही, पण गोष्ट सांगायचं वचन देतो."

फार वेळ विचार न करता देन्लीने तात्काळ आईला हाक मारली व तो औषध प्यायला. आईने दिवा विझवला व हलक्या पावलांनी ती खोलीतून बाहेर गेली. देन्ली अचानक आज्ञाधारक मुलगा बनल्याबद्दल तिला खूप आश्चर्य वाटले. देन्लीने आपल्या नव्या मित्राला हळूच हाक मारली :

"शीर्दाक! मी औषध प्यायलो! तू कुठं आहेस?"

"मी इथं आहे," उशीच्या टोकावर बसत शीर्दाक म्हणाला. "तू औषध छान प्यायलास, आता ऐक." आणि शीर्दाकने गोष्ट सांगितली.

# भले आणि वाईट

खूप खूप वर्षांपूर्वी एक म्हातारा रहात होता. त्याची म्हातारी बायको व एक मरतुकडे म्हातारे गाढव यांच्याशिवाय त्याच्यापाशी दुसरे काहीही नव्हते. वाळवंटात म्हातारा सर्पण गोळा करायचा, ते बाजारात विकायचा व त्यावर तिघांची गुजराण करायचा.

एकदा म्हातारा वाळवंटात भटकत होता तेव्हा दूरवर त्याला आकाशापर्यंत भिडलेल्या दोन चक्री वावटळी दिसल्या: एक पांढरी व दुसरी काळी.

वावटळी अधिक चांगल्या न्यहाळण्यासाठी तो त्यांच्या जवळ गेला, तेवढ्यात पांढऱ्या वावटळीचे अचानक पांढऱ्या सापात रूपांतर झाले.

पांढरा साप सरपटत म्हाताऱ्यापाशी आला आणि माणसाच्या आवाजात म्हणाला :

"हे म्हाताऱ्या! मी हवं ते रूप घेऊ शकतो. आत्ता मी सुई बनतो आणि तू पटकन

मला खिशात लपव. काळा साप माझा हाडवैरी आहे. जेव्हा तो तुझ्याजवळून निघून जाईल, तेव्हा खिशामधून सुई बाहेर काढ आणि मग मी तुझी कोणतीही इच्छा पूर्ण करीन."

म्हाताऱ्याने आश्रिताला मदत करण्यास होकार दिला.

"पांढऱ्या सापाच्या नावानं, काळया सापाच्या नावानं, मी सुई बनतो!" पांढरा साप म्हणाला व तात्काळ सुई बनला.

म्हाताऱ्याने सुई पटकन उचलली व खिशात लपवली.

तेवढ्यात काळी चक्री वावटळ त्याच्यापाशी आली, तिचे काळया सापात रूपांतर झाले व सापाने विचारले:

"ए म्हाताऱ्या, इथं पांढरा साप आला होता?"

"नाही," म्हातारा उत्तरला.

"खरं बोल, नाही तर तुझं वाईट होईल!" काळा साप फूत्कारला.

त्याची ब्याद टाळण्यासाठी म्हातारा हात झटकत म्हणाला:

"काय झालं ते मला माहीत नाही, पण तिकडं एक पांढरी चक्री वावटळ उडत गेली."

काळा साप त्याच क्षणी काळी चक्री वावटळ बनला व पांढऱ्या सापाच्या पाठला-गावर निघाला.

म्हाताऱ्याने खिशातून सुई बाहेर काढत म्हटले:

"तुझा वैरी निघून गेला."

सुईचे सापात रुपांतर झाले.

"हे माझ्या रक्षणकर्त्या, बोल तुझी इच्छा."

"मला तसं विशेष काही नको. फक्त सर्पण आपोआप गाढवाच्या पाठीवर लादलं जावं आणि गाढवानं आपोआप माझ्यापुढं चालत जावं."

"पांढऱ्या सापाच्या नावानं, काळया सापाच्या नावानं, म्हाताऱ्याच्या इच्छा पुऱ्या होवोत!" पांढरा साप म्हणाला.

आणि खरेच तसे घडले. सर्पण गाढवाच्या पाठीवर आपोआप लादले गेले, गाढव आनंदाने खूर आपटत दुडक्या चालीने आपोआप घराच्या दिशेने चालू लागले. चिकण-मातीच्या सात थरांनी बनविलेल्या शहराच्या तटाच्या भिंतीपाशी त्यांना राजकन्या भेटली. पांढऱ्या उंटाच्या पाठीवर ठेवलेल्या सोनेरी पालखीत ती बसली होती. मालकाने हाकलल्याविना आपोआप त्याच्यापुढे चालणाऱ्या गाढवाला पाहून राजकन्येने सेवकांना थांबण्याची आज्ञा केली व म्हाताऱ्याला विचारले:

"तुझं गाढव खूप अनुभवी दिसतंय. सांग म्हाताऱ्या, कुणी त्याला शिकवलं?"

“तू कोण आहेस?” म्हाताऱ्याने विचारले.

“मी राजकन्या आहे.”

“असं असेल तर मी उत्तर देत नाही. कारण माझं उत्तर जर तुला आवडलं नाही, तर तू मला फाशी देशील.”

“न घाबरता उत्तर दे,” राजकन्या म्हणाली.

“जर तुझी इच्छाच असली तर ऐक: हे त्याला भुकेनं शिकवलं.”

राजकन्येने प्रवास पुढे चालू केला, पण हेरांनी त्याच क्षणी राजापाशी खबर दिली:

“सर्पण विकणाऱ्या म्हाताऱ्याशी तुझी मुलगी बोलली.”

राजा चिडला व म्हाताऱ्याला पकडून आणण्याचा त्याने हुकूम दिला.

बिचाऱ्या म्हाताऱ्याला पकडून राजवाड्यावर आणण्यात आले आणि राजाने कोणतीही चौकशी न करता हुकूम दिला:

“ह्या उर्मटाला चाबकाचे फटके मारा आणि शहरामधून हाकलून द्या.”

राजाच्या सेवकांनी म्हाताऱ्याला चाबकाचे फटके मारले, रक्षकांनी म्हाताऱ्याच्या मोडक्या खोपटाला आग लावली व म्हाताऱ्याला आणि म्हातारीला शहरातून हाकलून लावले.

ती दोघे वाळवंटातून भटकत होती, तेवढ्यात पांढरा साप त्यांना भेटला.

“म्हाताऱ्या, तुझ्यावर कोणतं संकट कोसळलं?”

म्हातारा उत्तरला:

“आमच्या राजानं क्षुल्लक कारणापायी मला मार दिला आणि राज्यामधून हाकलून लावलं. तू मला एक राजवाडा बांधून दे. तो संगमरवराचा असावा, त्याच्या चार मनोऱ्यांवर सोनेरी कोंबडे बसव आणि त्यांनी आरवलं पाहिजे. भिंतींपलिकडं तामदिरी बसव.”

“पांढऱ्या सापाच्या नावानं, काळ्या सापाच्या नावानं, म्हाताऱ्याच्या इच्छा पूर्ण होवोत!” पांढरा साप म्हणाला.

वाळवंटात संगमरवरी राजवाडा उभा झाला. म्हातारा व म्हातारी त्यात सुखासमाधानाने राहू लागले.

एकदा राजा शिकारीला गेला होता तेव्हा वाळवंटात त्याला संगमरवरी राजवाडा दिसला. घोडा मागे वळवून त्याने आपल्या रक्षकांना गोळा केले व आज्ञा केली:

“माझ्या परवानगीविना माझ्या जमिनीवर कुणीतरी राजवाडा बांधलाय. जा, त्या हरामखोराला पकडून माझ्यासमोर हजर करा. जर त्यानं प्रतिकार केला, तर त्याचं तोडलेलं मुंडकं घेऊन या!”

भयंकर आरोळ्या ठोकत राजाचे रक्षक संगमरवरी राजवाड्यावर चालून गेले. त्याच क्षणी पांढरा साप म्हाताऱ्यासमोर हजर झाला व त्याने विचारले :

"मी त्यांचं काय करू?"

"तुला योग्य वाटेल ते कर," म्हातारा उत्तरला.

"पांढऱ्या सापाच्या नावानं, काळया सापाच्या नावानं, म्हाताऱ्याच्या संमतीनं, हे सैनिक पुढच्या दिशेला पाठी करून राजाच्या दरबारात दौडत जावोत!"

पांढऱ्या सापाच्या वाणीप्रमाणे त्याच क्षणी सर्व घडले.

पाठी करून दौडत सारे रक्षक राजासमोर कोसळून पडले आणि रक्षकांचा प्रमुख राजाच्या पाया पडत म्हणाला:

"देव असल्या वैऱ्यापासून रक्षण करो! नाही, राजा, तूच त्याच्याशी लढ. आम्ही त्याचं तोंडसुद्धा पाहिलं नाही, तरी आमची त्यानं काय दैना केली पहा!"

"फुकटखाऊ!" राजा पाय आपटत ओरडला. रक्षकांच्या प्रमुखाच्या हनुवटीवर त्याने ठोसा मारला व वजीरासकट तो संगमरवरी राजवाड्याकडे निघाला.

त्यांना पाहून म्हातारा पांढऱ्या सापाला म्हणाला:

"आता राजा वजीरासकट आलाय."

"मी त्यांचं काय करू?" पांढऱ्या सापाने विचारले.

"तुला योग्य वाटेल ते कर", म्हातारा उत्तरला.

"पांढऱ्या सापाच्या नावानं, काळया सापाच्या नावानं, म्हाताऱ्याच्या संमतीनं, राजा गाढव होवो आणि वजीर गाढवाचं पोर होवो. ते गाढवाप्रमाणं ओरडोत आणि संगमरवरी राजवाड्याभोवती सात फेऱ्या मारोत!"

राजा व वजीर गाढव बनले आणि मोठमोठ्याने ओरडत राजवाड्याभोवती धावू लागले.

म्हातारी ह्यावेळी तामदीरवर पाव भाजत होती. गाढवे जेव्हा तिच्याजवळून धावत गेली, तेव्हा ते झार आणि वजीर आहेत हे तिला माहीत नसल्यामुळे तिने त्यांना काठी मारून हाकलले. गाढवे सात फेऱ्या मारून उभी राहिली.

"पांढऱ्या सापाच्या नावानं, काळया सापाच्या नावानं, म्हाताऱ्याच्या संमतीनं, पूर्वीसारखे व्हा!" पांढरा साप म्हणाला.

गाढवे पुन्हा राजा व वजीर बनली.

"हे माननीय पांढऱ्या सापा!" म्हाताऱ्याने विनंती केली. "त्यांना अत्यंत माफक उदरनिर्वाह दे. यापुढं त्यांना घरादाराविना जगभर भटकायला लाव, जसं त्यांनी इतरांना भटकायला लावलं होतं. भलेपणा आणि वाईटपणा त्यांना स्वतःच्या अनुभवांवरून समजू दे!"

दुसऱ्या दिवशी देन्ली आज्ञाधारकपणे औषध प्यायला आणि रात्री शीर्दाक त्याच्यापाशी आला व त्याने आणखी एक गोष्ट सांगितली.

## एकडोळ्या डोंबकावळा

कोणे एके काळी एक गुराखी रहात होता. त्याची बायको होती, एक गाय होती आणि त्याचे चिकणमातीचे एक छोटे घर होते. बायको गायीचे दूध काढायची, दूध आंबवायची आणि गुराखी त्याचे पनीर बनवून छपरावर वाळत घालायचा. एकदा गुराख्याला संशय आला की, कुणीतरी पनीर चोरत होते.

त्याने व बायकोने मिळून सापळा लावला. काही काळानंतर त्यांना दिसले की, एक एकडोळ्या डोंबकावळा तेथे उडत आला व छपरावर बसून पनीरला चोच मारू लागला.

गुराख्याने डोंबकावळ्याला पकडले व त्याची मुंडी तो मुरगळणार, एवढ्यात डोंबकावळ्याने विनवणी केली:

"तू मला ठार मारू नको, मी तुला खूप काही देईन. उद्या माझ्या घरी ये, तुला कुणीही माझ्या घराची वाट सांगील."

एकडोळ्या डोंबकावळ्याच्या शब्दांवर नवरा-बायकोने विश्वास ठेवला व त्याला सोडून दिले.

दुसऱ्या दिवशी गुराख्याने गायींचा कळप खेड्यात सोडला व एकडोळ्या डोंबकावळ्याचे घर शोधायला तो निघाला.

खूप खूप चालल्यानंतर त्याला मेंढ्यांचा कळप चरत असलेला दिसला.

"कुणाच्या ह्या मेंढ्या?"

"एकडोळ्या डोंबकावळ्याच्या!" मेंढपाळ उत्तरले.

"तो कुठं राहतो?"

"ह्या रस्त्यानं जा. तुला घोड्यांचे राखणदार भेटतील. पुढची वाट त्यांना विचार."

गुराखी दाखविलेल्या रस्त्याने निघाला. घोड्यांचे राखणदार घोड्यांना चारत असलेले त्याने पाहिले. त्याने राखणदारांना विचारले:

"कुणाचे हे घोडे?"

"एकडोळ्या डोंबकावळ्याचे."

"त्याचं घर कुठं आहे?"

"ह्या रस्त्यानं जा, तुला उंटांचा कळप भेटेल. तिथं तुला समजेल."

गुराखी दाखविलेल्या रस्त्याने निघाला आणि त्याला उंटांचा कळप भेटला.

"कुणाचे हे उंट?"

"एकडोळ्या डोंबकावळ्याचे!" त्याला उत्तर मिळाले.

"त्याचं घर कसं शोधायचं?"

"तू असा ह्या रस्त्यानं जा."

गुराख्याने एकडोळ्या डोंबकावळयाचे घर शोधून काढले. मेंढयांच्या, घोडयांच्या, उंटांच्या कळपांचा मालक त्याला प्रेमाने भेटला. गुराख्याला तऱ्हेतऱ्हेची मिष्टान्ने चाखायला मिळाली. त्यांनी मनसोक्त गप्पा मारल्या.

निरोपाच्या वेळी एकडोळ्या डोंबकावळयाने गुराख्याला एक चादर दिली.

"फक्त म्हण: 'उलगड चादरी उलगड! खायचे जिन्नस मांड!' आणि तुला हवे ते खाद्यपदार्थ चादरीवर असतील. पोट भरलं म्हणजे म्हण: 'मिट चादरी मिट!'"

गुराखी घरी परतला व बायकोला म्हणाला:

"हात धू आणि खायला बैस!"

"काय खाणार आपण? मी तर स्वैपाक केलाच नाही," बायको उत्तरली.

गुराख्याने हात धुतले, गालिचावर बैठक मारली व समोर चादर ठेवून तो म्हणाला:

"उलगड चादरी, उलगड! खायचे जिन्नस मांड!"

चादर उलगडली व तिच्यावर तऱ्हेतऱ्हेचे खाद्यपदार्थ मांडले गेले.

दोघांनी भरपूर खाल्ले व गुराखी म्हणाला: "मिट चादरी, मिट!"

चादर मिटली.

"उद्या राजाला आणि त्याच्या सगळ्या मानकऱ्यांना जेवायला बोलावतो!" गुराखी म्हणाला.

"सोडून दे विचार!" बायको म्हणाली. "आपल्यापासून ही वस्तू ते हिसकावून घेतील."

"एकदा बोललो त्याप्रमाणं मी वागणार!" गुराखी हट्टाने म्हणाला. "ही चादर मी मिळवलीय!"

राजाला व त्याच्या मानकऱ्यांना त्याने निमंत्रण दिले. ते आले. गुराख्याने आपली चादर गालिचावर पसरली व म्हटले:

"उलगड चादरी, उलगड! खायचे जिन्नस मांड!"

राजासमोर व त्याच्या मानकऱ्यांसमोर तऱ्हेतऱ्हेची मिष्टान्ने मांडली गेली.

पाहुणे पोटभर खाऊन निघून गेले. राजवाड्यावर आल्यानंतर राजाने दोन पहारेकऱ्यांना हुकूम दिला:

"जा आणि त्या हरामखोर गुराख्यापासून जादूची चादर हिसकावून आणा! जर त्यानं प्रतिकार केला, तर त्याचं मुंडकं उडवा!"

पहारेकरी गुराख्याकडे आले आणि त्याची जादूची चादर हिसकावून घेऊन गेले.

गुराख्याला एकडोळ्या डोंबकावळ्याकडे परत जावे लागले. तो डोंबकावळ्याला म्हणाला:

"राजानं तुझी चादर हिसकावून घेतली."

डोंबकावळ्याने गुराख्याला एक गाढव देऊन म्हटले:

"त्याला म्हण: 'झ्याक!' आणि तो लेंडकांऐवजी सोनं उधळेल."

गुराखी गाढवावर बसून घराकडे निघाला. त्याची वाट राजाच्या राजवाड्याजवळून जात होती.

"पापापासून दूर रहावं!" गुराख्याने विचार केला व गाढवाला टाच मारीत तो ओरडला: "झ्याक! झ्याक!" असेच ओरडून सर्वसाधारणपणे गाढवांना पळवतात.

पण गाढवाने तात्काळ सोने उधळले. राजाने तो चमत्कार पाहिला आणि एकडोळ्या डोंबकावळ्याने गुराख्याला दिलेले हे गाढव राजाने हिसकावून घेतले.

दुसऱ्या दिवशी बिचारा गुराखी परत डोंबकावळ्यापाशी आला. तेथे बसून रडू लागला.

"कुणी तुझा अपमान केला?" एकडोळ्या डोंबकावळ्याने विचारले.

"राजानं गाढव माझ्यापासून हिसकावून घेतलं."

डोंबकावळ्याने आठ्या घातल्या, पण गुराख्याला तिसरी वस्तू भेट दिली — रंगीत पेटी. तो म्हणाला:

"तू फक्त एवढंच म्हण: 'उघड पेटी, उघड! सोट्यासकट बाहेर ये!' ताबडतोब पेटीमधून सोट्यासकट एक माणूस बाहेर येईल आणि तिथं असलेल्या लोकांना मरेपर्यंत बदडून काढील. झोडपणं पुरे झालं असं जेव्हा तुला वाटेल, तेव्हा म्हण: 'सोट्यासकट आत जा!' सोटेवाला पटकन पेटीत जाऊन बसेल."

गुराखी रंगीत पेटी काखोटीत धरून निघाला. त्याच्या मनात संशय निर्माण झाला:

"एवढ्याशा लहान पेटीत सोट्यासकट माणूस मावणं कसं शक्य आहे?"

त्याने कसोटी घेण्याचा निर्णय केला.

त्याने टेकाडावर पेटी ठेवली, तो स्वत: नाल्यात लपला व दुरून ओरडला:

"उघड पेटी, उघड! सोट्यासकट बाहेर ये!"

पेटीमधून सोट्यासकट एक माणूस बाहेर पडला. त्याने आजूबाजूला पाहिले तर कुणीही नाही — फक्त गुराखी नाल्यात लपला होता. तो गुराख्याला सोट्याने झोडपू लागला.

"सोटचासकट आत जा! बंद हो पेटी, बंद हो!" गुराखी ओरडला.

सोटेवाला पेटीत लपला. गुराख्याने पेटी घेतली व तो थेट राजवाड्याच्या अंगणात गेला. ठळक जागी त्याने पेटी ठेवली आणि स्वतः लपून तो ओरडला:

"उघड पेटी, उघड! सोटचासकट बाहेर ये!"

पेटीतून सोटेवाला बाहेर पडला आणि राजाला, वजीराला, मानकऱ्यांना त्याने झोडपायला सुरुवात केली. तो एवढा बेफाम बनला की, त्याने राजवाडा उध्वस्त केला.

तेव्हा कुठे गुराखी ओरडला:

"सोटचासकट आत जा! बंद हो पेटी, बंद हो!"

पेटी बंद झाली. गुराख्याने स्वतःची चादर शोधून काढली, गाढव घेतले आणि घरी परतून सबंध जगाला मेजवानी दिली.

तेव्हापासून तो सुखा-समाधानाने राहू लागला, गरजवंतांना मदत करू लागला, भुकेल्यांना पोटभर खाऊ घालू लागला.

त्याच्या मरणानंतर त्याचे भले नाव राहिले.

तिसऱ्या दिवशी देन्ली आजारातून बरा झाला. पण शीर्दाक परत त्याला भेटायला आला आणि त्याने मजेदार गोष्ट सांगितली.

# केलेव

फार प्राचीन काळी केलेव नावाचा एक माणूस रहात होता. एकदा त्याच्या बायकोने त्याला पैसे देऊन सांगितले:

"बाजारात जा आणि लोणी विकत घे."

लोण्यासाठी केलेवने सुकवलेल्या रिकाम्या भोपळ्याला घेतले, तो गाढवावर बसून बाजाराकडे निघाला.

त्याने लोणी विकत घेतले आणि परतीच्या वाटेवर असताना विश्रांती घेण्याचा निर्णय घेतला.

तो गाढवावरून खाली उतरला, लोणी भरलेला भोपळा त्याने जमिनीवर ठेवला आणि गाढव कशाला बांधून ठेवावे ह्याबद्दल तो विचार करू लागला. ती जागा ओसाड आणि सपाट होती. ना झुडूप ना गवत. केलेवनं भोपळा पाहिला, तो आनंदला व भोपळ्याच्या मानेभोवती त्याने गाढवाला बांधले.

"किती चतुर आहे मी!" असा विचार करीत केलेव झोपला.

गाढव खूप वेळ उभे राहिले, मग मान हलवून मोठ्यांदा ओरडले आणि भटकायला

निघाले. जाताना ते स्वतःबरोबर भोपळ्यालाही फरफटत नेऊ लागले. केलेव त्याचा पाठलाग करू लागला. काही वेळा तो गाढवाला पकडण्याच्या बेतात असायचा, पण तेवढ्यात गाढव निसटायचे!

भोपळा एका टेकाडावरून दुसऱ्या टेकाडावर उडत होता, फुटून त्याच्या ठिकऱ्या उडाल्या आणि गाढव गायब झाले.

आता काही उपाय नव्हता. केलेव गाढव शोधायला निघाला. वाटेत त्याला एक माणूस भेटला.

"तू माझ्या गाढवाला बघितलंस?" केलेवने विचारले.

त्या माणसाच्या ध्यानात आले की, त्याच्यासमोर बावळट उभा आहे आणि त्याने गंमत करण्याचे ठरविले:

"बघितलं."

"कुठं?"

"ते आता राजवाड्यात आहे, त्याला काजी बनवलंय."

क्षणाचा विचार न करता केलेव काजीच्या घराकडे गेला, त्याने काजीला धरून रस्त्यावर आणले व तो खेकसला:

"चल बघू!"

काजीच्या व केलेवच्या भोवती माणसे जमली, विचारू लागली.

"केलेव, तू त्याला कुठं खेचून नेतो आहेस?"

"घरी. खरं तर हे माझं गाढव आहे. लोणी भरलेल्या भोपळ्याला मी ते बांधून ठेवलं होतं. आणि ते पळालं. भोपळा फुटला, लोणी सांडलं. मग आता काय स्वतःच्या गाढवालासुद्धा गमावून बसू?" केलेवने स्वतःची हकीकत सांगितली व काजीवर तो पुन्हा खेकसला: "चल, जागचा हल बघू!"

काय करावे ते काजीला समजेना. लोक हसत होते, केलेव त्याला रेटत होता.

"ह्याला भरपाई देणं उत्तम ठरेल," काजीने विचार केला व गाढव, लोणी आणि भोपळ्याबद्दल त्याने केलेवला पैसे दिले.

पैसे घेऊन केलेव घरी निघाला. तेवढ्यात काजीच्या एका नातेवाईकाला लोभ सुटला:

"हा बावळट खरंच सारे पैसे घेऊन जाणार काय! त्याच्यापासून ते लुबाडून घेतले पाहिजेत!"

तो पुढे धावला व दोन कलिंगडे घेऊन रस्त्यात बसला. एक कलिंगड कापून खाऊ लागला. केलेव तहानेने हैराण झाला होता. काजीच्या नातलगाने कलिंगडाची एक फाक कापून केलेवला दिली.

“चवदार आहे!” केलेव म्हणाला.

“हे कलिंगड आणखी चवदार आहे,” लबाड माणूस म्हणाला. “त्यात घोड्याचं शिंगरूसुद्धा आहे.”

“तुझ्या कलिंगडाची किंमत काय?” केलेवने विचारले.

“त्याची किंमत एका गाढवाच्या किंमतीएवढी आहे.”

“किती फायदेशीर,” केलेवच्या मनात विचार आला. “गोड कलिंगड खाईन आणि गाढवाऐवजी घोडं घेऊन घरी जाईन.”

त्याने कलिंगड विकत घेतले. लबाड माणूस त्याला म्हणतो:

“घरी पोहचेपर्यंत कलिंगड कापू नको, नाही तर शिंगरू पळून जाईल.”

पाण्याने पूर्ण भरलेला खुजा न्यावा तसे कलिंगड हातात धरून केलेव जाऊ लागला व त्याला ठेच लागली.

त्याच्या हातून कलिंगड निसटले, जमिनीवर आपटले व फुटले.

योगायोगाने एक ससा तेथे झोपलेला होता. कलिंगड आपटल्याच्या आवाजाने तो जागा झाला व धूम पळाला.

“माझं शिंगरू पळून चाललंय वाटतं!” केलेव सशाला पहात मनाशी म्हणाला.

सुस्कारे टाकत तो घरी आला.

त्याला पाहताच बायकोने विचारले:

“लोणी कुठं आहे?”

केलेव संतापून उत्तरला:

“मूर्ख बाई, माझं शिंगरू पळून गेलं, पण तुझ्या टाळक्यात लोण्याचाच विचार!”

स्वतःच्या साहसांची कहाणी त्याने सांगितली तेव्हा बायको त्याला म्हणाली:

“किती महामूर्ख आहेस तू!”

## हरण

•

तुम्ही नुकत्याच वाचलेल्या शीर्दाकबद्दलच्या सर्व गोष्टी मी पूर्वी वर्तमानपत्रात प्रसिद्ध केलेल्या होत्या. एकदा एक अनोळखी माणूस माझ्याकडे आला.

“मी तुमचा वाचक आहे,” तो मला म्हणाला. “शीर्दाकशी माझी भेट कशी झाली ती हकीकत तुम्हाला सांगावी अशी इच्छा आहे.”

“पण माझ्या माहितीप्रमाणं शीर्दाक फक्त लहान मुलांना दिसतो.”

“होय, माझ्या बालपणची हकीकत मी तुम्हाला सांगणार आहे,” वाचकाने स्मित केले.

मी त्याला गालिचावर बसविले आणि हिरवा चहा पाजला. माझ्या वाचकाची हकीकत मला खरी वाटली, म्हणून मी ती लिहिली व ह्या पुस्तकात घातली.

“माझं नाव मेयलीस,” माझ्या नवपरिचिताने असा आरंभ केला. “माझे वडील शिकारी होते. एकदा त्यांनी हुर्जूनमधून छोट्या बोकडासारखा दिसणारा एक प्राणी आणला. ते हरणाचं पाडस होतं. स्तेपमध्ये वडिलांना ते एकाकी सापडलं होतं. त्याच्या आईवर बहुधा संकट कोसळलं होतं. सुदैवानं ह्याच दिवसात आमच्या बकरीला करडं झाली होती आणि पाडसाला आम्ही बकरीपाशी सोडलं. बकरीनं प्रथम त्याला दूर पळवून लावलं, पण मग तिला पाडसाची दया आली: तिनं त्याला दूध पाजलं आणि चाटलं. बकरीला तीन करडं होती, आता चार झाली. आम्हा सर्वांना पाडस आवडायचं आणि तेसुद्धा आमच्याशी प्रेमानं वागायचं. उन्हाळा सरला, शरद आणि हिवाळा पार पडले व एकदा वसंतात पाडस सकाळी स्तेपमध्ये पळून गेलं, रात्री परतलं नाही. बकरी केविलवाणी बेंबाटत होती, मीसुद्धा रडलो. मध्यरात्री जाग आल्याचं मला आठवतं. मला आवाज ऐकल्याचा भास झाला: ‘दु:ख करू नको! तुझं हरण परतेल. मी स्वत: त्याला आणीन.’ आणि खरंच, तिसऱ्या दिवशी हरण परतलं. ‘रात्री माझ्याशी कोण बरं बोललं होतं,’ मी विचार केला आणि दुसरं काही उत्तर सापडलं नाही, तेव्हा निर्णय केला की, तो कुणीतरी भला जादूगार असावा.

“स्वतंत्र भटकल्यापासून आमच्या हरणाचा स्वभाव बदलला होता. जेव्हा मी त्याला मिठी मारू पहायचा, तेव्हा ते सावधपणं दूर जायचं!

“‘जर आणखी एकदा पळालं, तर परतणार नाही,’ वडील म्हणाले आणि त्यांनी हरणाला दोरीनं बांधून घातलं.

“काही काळ लोटला आणि आमच्याकडं पाहुणे आले होते.

“‘उद्या तुला हरणाची सागुती खाऊ घालतो,’ वडील त्यांच्या मित्राला म्हणाले.

“रात्री खूप वेळपर्यंत मला झोप येईना. एकदम चंद्राच्या किरणात मला मजेशीर टोपी घातलेला छोटा माणूस दिसला.

“‘माझं नाव शीर्दाक,’ तो म्हणाला. ‘असा निजून काय राहिलास? तुझ्या हरणावर कोणतं संकट कोसळणार आहे हे काय तुला माहीत नाही? एवढ्याचसाठी का त्याला मी स्तेपमधून इथं आणलं?’

“मी ताडकन उठलो, त्या छोट्या माणसाला नीट पाहण्याचा प्रयत्न केला, पण तो नाहीसा झाला. तेव्हा मी घरातून हळूच बाहेर पडलो, गोठ्यात गेलो आणि हरणाची

दोरी सोडून टाकली. निरोपाखातर मी त्याच्या कानांमागं खाजवलं, त्याला मिठी घातली आणि त्याच्या काळजाची मोठ्यांदा चाललेली धडधड ऐकली.

"स्तेपमध्ये ते कसं धावलं हे मला आठवतं. पहाट फुटत होती, हरणाच्या चपळ पायांमागं हलकी धूळ उडत होती. मला दुःख वाटत होतं आणि आनंदही झाला होता."

मेयलीस-आगाकडून शीर्दाकबद्दलची ही हकीकत मी ऐकली. त्यांची गोष्ट ह्या पुस्तकात घालताना मी आशा धरतो की, शीर्दाकला भेटलेल्या अथवा त्याच्याशी मैत्री जडलेल्या इतर वाचकांकडूनही मला प्रतिसाद मिळेल.



माननीय वाचक !

प्रस्तुत पुस्तकाबाबतची आपली मते आणि सूचना जाणून घेण्यास आम्हाला आनंद वाटेल.

रशियन आणि सोविएत साहित्याचे तुमच्या मातृभाषेतील अनुवाद आमच्या लोकांच्या संस्कृतीची व जीवनाची सखोल ओळख करून घेण्यास आपल्याला मदत करतील अशी आशा आहे.

आमचा पत्ता : 'रादुगा' प्रकाशन, १७ झूबोवस्की बुलवार, मॉस्को, ११९८५९ सोविएत संघ.

